पेशवे दप्तरांतून निवडलेले कागद

# १

# बाजीराव—कौटुंबिक

[ किंमत— १० आणे किंवा १ शिलिंग १ पेन्स ]

गव्हर्नमेंट सेंट्रल प्रेस, मुंबई

१९३१

# *BAJIRAO AND HIS FAMILY*

With the death of Aurangzeb in 1707, the illustrious dynasty founded by Babur began to decline, and upon the political arena of the Indian continent appeared rival claimants who hotly contested the suzerainty of the defunct empire. The Marathas, against whom the old monarch had carried on a ceaseless struggle for nearly a quarter of a century, remained unsubdued to the last, and when they found the opposition crumbling away, they were not slow to avail themselves of the advantageous position they had won. They crossed the Nerbudda and overran the rich provinces of the empire. In their career of conquest fortune favoured them with a leader of rare ability in Bajirao Ballal, about whose family the papers here presented furnish interesting details.

Bajirao, a bluff soldier, interested himself but little in domestic affairs, which were ably managed by his mother Radhabai and his younger brother Chimaji Appa. It was under Radhabai's iron discipline that Bajirao and Chimaji were trained to the habits of simplicity, adventure and industry to which they owed their success in life. Radhabai's masterful personality looms large in these letters. She makes anxious inquiries about her children and their doings ; she is afraid her son is no match for the wily Nizam, and advises Bajirao not to visit him unless accompanied by the Sumant and Somavansi (Letter No. 7). Chimaji's ill-health causes her ceaseless anxiety, and she repeatedly requests him to return to Poona from the unhealthy monsoon climate of Bassein. Everybody in the household holds her in the highest respect and obeys her smallest wish. She has only to mention she desires to bathe in the sea on the Amavasya day and Chimaji makes elaborate preparations for her journey to Bassein from Poona (Letter No. 19). In 1735 she started on a pilgrimage to Benares which she completed in April 1736. In a letter (No. 11) couched in the most affectionate terms, Chimaji writes, "You desire to take little Sadashiv with you on your pilgrimage. No doubt he will receive presents from Sawai Jaysing and other princes. But why should we think about these princely gifts when we have everything one can wish for? Moreover he is so young, he will be a perfect nuisance to you on your journey! Mother dear, when I last parted from you I should have walked by the side of your palanquin on foot ; but to my regret, in the hurry of the moment the idea escaped me altogether. On account of this lapse I am quite upset, and I shall not feel at rest unless you assure me that you have overlooked my rudeness". Another letter informs us that the Maharaja of Udaipur gave the venerable lady a rousing reception when she reached his capital. Pilgrimages to Pandharpur, Mahabaleshwar and other sacred places in Maharashtra are referred to in some other letters. In matrimonial affairs Radhabai prudently tried to secure rich heiresses for her grandsons, realizing as she did the important part played by money in political undertakings.

Chimaji Ballal, or Chimaji Appa as he was familiarly called, is another striking personality. Rare are instances of fraternal love such as existed

between these two distinguished brothers. Though eclipsed by the exploits of his brother, Chimaji was in no way his inferior either at court or on the field. A brave soldier and a skilful general, Chimaji possessed that wonderful quality of tact, with which he helped Bajirao to retain the King's favour. Bajirao, engaged in distant expeditions, despised the petty intrigues of the Court at Satara, which but for the wise mediation of Chimaji, would have seriously hampered him in his task.

In the latter part of his life Bajirao became enamoured of a beautiful dancing girl of Musalman extraction named Mastani and completely neglected affairs of state. The origin of Mastani and her first meeting with the Peshwa still remain in the dim twilight of legendary history. But letters (Nos. 30-36) for the first time disclose what a commotion the Peshwa's growing infatuation and the licentious habits he seems to have developed, particularly as regards drinking and eating meat, caused in the family. A letter (No. 30) tells us that while the Peshwa was riding out one day he accosted the Patil of a village and in an unguarded moment asked to be provided with fowls. In another letter Chimaji informed his nephew Nana that Bajirao had solemnly promised to give up taking intoxicants after purifying himself in the holy waters of the Ganges, provided that his mistress was allowed to return. Chimaji however was pessimistic about the promise being kept (No. 31). The King when requested to admonish the Peshwa for his *liaison* could only say in reply that Bajirao would be induced to mend his ways not by external pressure, but only when he could be brought to repent (No. 32). Chimaji in utter exasperation remarks, " I tried my utmost to persuade him to mend his ways. But God wills it otherwise. I leave him to his fate."

Some of the Peshwa's relatives are mentioned in letter (No. 41). Govind Krishna writes how the work at the Poona Palace was progressing. Some captive *Firangees* were skilful workmen and were put to work at the building. Telescopes, lamps, glasses, watches and other articles of European make interested the Peshwa greatly, and were bought for him by his agents posted at Bombay (Nos. 9, 10).

श्री

वेदमूर्ती राजश्री कृष्णभट करवे स्वामींचे सेवेसी सेवक बाजीराऊ बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहले. अनुष्ठान अधिक वद्य त्रयोदसीस संपूर्ण होते त्यास काये आज्ञा ? संपूर्ण करावे तरी पूजा दक्षणा व येथील ब्राम्हणांस भोजन पाहिजे. पुढे चालते करावे तरी ब्राम्हणाचे श्रम आहेत दक्षणा द्यावी लागेल न ये गोष्टी * * * * * * वी म्हणून लिहिले. येसियास अनुष्ठान तुम्ही भाद्रपद सुध चतुर्थीपर्यंत अनुष्ठान चालवणे. ब्राम्हणास सामग्री पाहिजे त्यास पेशजीचे माईनेप्रमाणे नारो जनार्दन याजकडून देविली आहे व पुजेचे व दक्षणेचे साहित्य लागेल त्यास रा त्रिंबक हरी सुभेदार पा सुपे यास आज्ञा केली आहे. साहित्य करितील. पुजेचे साहित्य सुपाहून अनकूल पडल ते पडल. तेथे अनकुल न पडे तरी येथे लिहून पाठवणे. येथून पाठऊन. अनुष्ठान चालते करणे. संपूर्णास च्यार पाच रोज पुढे राहातील तेव्हा ब्राम्हणाचे दक्षणेची व ब्राम्हण भोजनाची अनकूलता येथून करून पाठऊन. अनुष्ठान तुम्ही करीत आहा परंतु ज्या कार्यासाठी करविले आहे त्या कार्याचे निदर्शन येत नाही. तेव्हां अनुष्ठानाचे ठायी कांही अंतर पडते किंवा काय हे न कळे. या उपरी समस्त ब्राम्हण येकचित्त किमपि अंतर पडू न देता निष्ठापूर्वक अनुष्ठान करून कार्य-सिधी सत्वर होये ते करणे. येविसी तुम्हास विस्तार ल्याहावा येसा नाही. सामग्रीची अनकूलता नारो जनार्दन याजकडून करविली आहे. ते अनकूलता करतील. जाणिजे छ १० सवाल बहुत काय लिहिणे. अनुष्ठानास बहुत दिवस जाले परंतु स्वप्न काही होत नाही, तर अनुष्ठान सांग होत नाही की काये ? अनुष्ठान सांग करून जे गोष्टीने कार्यसिध होये ते गोष्ट केली पाहिजे. दक्षणा फार द्यावी लागेल ब्राम्हणास श्रम पडतो म्हणोन लिहिले तर ब्राम्हणाचे समाधान करून सागणे ब्राम्हणास दक्षणा उतम प्रतीने देऊन. कळले पाहिजे * अनुष्ठान सांग होऊन कार्यसिधि होये ते गोष्ट करणे. बहुत काय लिहिणे ! साहित्याविसी त्रिंबक हरीस आज्ञा केलीच आहे. कदाचित काही जिनस तेथे मिळेनासारखा जाला तर लेहून पाठवणे. येथून पाठउन देऊन. हे विनंती.

¶*Letter addressed by Bajirao to Krishnabhat Karve, regarding some religious rites for attaining a certain object. Bajirao expresses wonder that the deity does not appear before the Brahmins in a dream.*

*From here the handwriting is of that Chimaji Appa.

No. 2] [1730 ?

श्री

श्रीसहस्रायु चिरंजीव राजश्री आपा यांसी

प्रतिपूर्वक विस्वनाथ भट मेहेंदळे वास्तव्य श्रीवर्धन कृतानेक आसीर्वाद उपरी. येथील कुशल ताा कार्तिक सुध पूर्णिमापावेतो सुखरूप असो विशेष. तुम्ही (त्रिंब) * * क विश्वनाथ याबरोबर पत्र पाठविले * * * तेथे लिहिले कीं गोविंद कृष्ण यांसी दूर केलें असे. मा * हून सरगुमास्ता पाठवावा तो रा केला जाईल. तूर्त महालोमहालचे गुमास्ते आहेत हे कामकाज चालवितील व मातुश्री आई तेथे आहेत ती दरयेक काजकाम सागतील त्यात मन घालून दरबाराची बोली चालू करीत जाणे. त्यावरून ते पत्र हुजूर रुजू केले बोलीचाली करावयाची ती केली. तो गोविंद कृष्णासहि करार करून पाठविले ते हुजूर रुजू जाहले. यावर तेथील बोलीचाली जे जाली ती मागील व पुढील त्रिंबक विश्वनाथ मुखवचनें विदित करील त्यावरून सविस्तर कळों येईल व मातुश्री आईनें लिहिलें आहे त्यावरून विदित होईल व गोविंदपंत आले त्यांबरोबर आम्हास फुकाचें पत्र लेहून पाठविलें नाहीं. काय म्हणऊन पाठविलें नाहीं हें कळों येत नाहीं. हरयेक बोलीचाली करावयाची ती करीतच असों हें वर्तमान परस्परें कळों येईल. विस्तार ल्याहावे ऐसे नाही आपण सूज्ञ आहेत. बहुत काय लिहिणें कृपेस अंतर केलें न पाहिजे. हे आशीर्वाद मातुश्रीमामीस नमस्कार. नानास आशीर्वाद.

¶*This letter gives a few definite relations of the Peshwas.*

राधाबाई=बाळाजी विश्वनाथ भट — बहीण=बहिरव भट मेहेंदळे

- बाजीराव
  - नानासाहेब
- चिमाजी आपा
- विश्वनाथ भट=पत्र लेखक
- गणपतराव
  - बळवंतराव

या कागदांत विश्वनाथभट चिमाजी आपास आशीर्वाद लिहितो म्हणून तो वयानें मोठा व त्याची आई बाळाजी विश्वनाथाची वडील बहिण असावी. नानासाहेबास आशीर्वाद आहे म्हणजे तो आठ-दाहा वर्षांचा असावा त्या वेळचें म्हणजे स. १७३० च्या सुमारचें पत्र आहे. विश्वनाथभटाचा पुतण्या बळवंतराव मेहेंदळे पानिपतावर पडला. श्रीवर्धनचे कारभारांत बाळाजी विश्वनाथाची बहीण लक्ष घालीत होती. मामी म्हणजे चिमाजी आपाची आई राधाबाई.

No. 3] [1730 ?

छ १४ मोहरम

श्री

पु॥ राजश्री पंतप्रधान स्वामींचे

सेवेसी

विनंती उपरी. फिरंगाणातून काफरी पलीन आले आसामी तीन ३ यास स्वामीकडे पाठविले आहेत. हे काम करावयास धक आहेत. तरी यांस वाडियाचे कामावरी ठेऊन काम घ्यावे आणि पोटास अडिसेरस मात्र पोटभर द्यावी व येक दुसरे धडुत द्यावे म्हणजे इमारतीचे कामावरी खपावयास बरे आहेत. यास मुशारा द्यावा लागेल. यास पारंगत विराड देऊन लिहिलेप्रमाणे द्यावे आणि काम घ्यावे. कळले पाहिजे. बहुत काय लिहिणे. लोभ केला पाहिजे हे विनंती.

No. 4] [9-3-1731 ?

छ १२ रमजान.

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसी.

आज्ञाधारक सिवराम कृष्ण साष्टांग नमस्कार विनंती. विनवावया प्रार्थना येसीजे. ताा छ ११ रमजानपावेतों स्वामींचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. यानंतर स्वामींनी आज्ञापत्र पाठविले पावले. लिहिले वर्तमान अक्षरसा कळले. तेथे आज्ञा कीं इमारतीचे वर्तमान लिहून पाठवणे. कुतरे ८ आठ पाठविले आहेत याची निघा करवणे म्हणून आज्ञा. आज्ञेप्रमाणे कुतरे पावले. त्याची निघा करणे ते करवितो. इमारतीचे वर्तमान तरी स्वामींची निजावयाची खोलीया २ त्याचे तख्तपोसी गिलावावरील आस्तरगारी देखील कारंजे करून सिमगियाकारणे जागा मुस्तेद[१] केला आहे व पुढील दिवाणखानियास रंग लाविला

१ तयार.

याउपरी जागाजागा वेलपते काढीत आहे. याउपरी रोगण होईल. पुढील दरवाजियाचा वरील खण तयार जाला. नवे घर करविले होते त्याचे पाये घातले आहेत. लाकड तासावयास सुतार लाविले आहेत. वाडियाचे विहिरीचे खडक फोडावयास पाथरवट लाविले आहेत. दोन गज खडक फोडिले. पाणी लागत नाही आणिखी येक गज फोडविती. पाणियाचे तोटा आहे. नदीजवळची भुडकीस विटाचा पाट बांधत आहेत. पाट तयार जालियावर मोटा लाऊ * येतील कीनिची लाकडे से दीडसे तासून आणिली. पौड खोरीतील वासे आरधे आणिले आरधे येतील. नाने मावलेच्या कडिया आद्यापि आणिल्या तोडिल्या नाहीत. याउपरी तोडणार आहेत. बागेतील विहिरीचे काम अनकूल पडिले नाही. कायें निमित्य तरी चालीस माणूस पाहिजे व पाथरवट पाहिजेत. त्यास पाथरवट तो वाड्याचे विहिरीस लाविले आहेत. चालीस माणूस तेथे लावावे तरी अगदीच इमारतीचे काम पडते. याजकरिता विहिरीचे काम चालिले नाहीं. क्षेमा केली पाहिजे. दिवाणखानियाजवलील राहाटाचा बंगल्याच्या भिंती चहुकडून मुस्तेद जाल्या. बाबूजी नाईक याजकडील गावकुसू सिध जाले. सेवसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Shivram Krishna reports to Bajirao in reply to his queries, the progress of the work of building the Shanwar Palace. He also adds that the eight dogs have safely arrived and will be properly looked after.*

*No. 5*] [*13-3-1733*

## श्री

श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री चिमाजी प्रति राधाबाई आसीर्वाद उपरी. आम्ही ताा छ ७ सवाल परियेंत कुशल आसो विशेष. तुम्हाकडील साप्रंत वर्तमान कलत नाहीं तरी सविस्तर लेहून पाठवीत जाणे. यानंतर चिरंजीव सौभाग्यवती कासीबाई फाल्गुण बहुल द्वादसीसह त्रयोदसीं मंदवासर संध्याकालचा सात घटिका दिवस उरला तसमई प्रसूत जाली. पुत्र[१] जाला. संतोषाचे वर्तमान

१ पत्रांत उल्लेख केलेल्या बाजीरावाच्या मुलाचा जन्म ता. ३-३-१७३३ रोजीं झाला. हा मुलगा लहानपणींच वारला असावा.

पूर्वी तुम्हास लेहून पाठविले आहे ते पत्र पावेल न पावेल म्हणून सांप्रत पत्र लेहून पाठविले आसे. तुम्ही आपणाकडील कुशल वृत्त लिहित गेले पाहिजे. बहुत काये लिहिणे हे+ आसीर्वाद

¶*Radhabai writes to her son Chimaji Appa that Kashibai has given birth to a male child. The last two words are in her own handwriting.*

*No. 6*] [*About 1733.?*

श्री

तीर्थ सौभाग्यवती मातुश्री
ताई वडिलाचे सेवेसी.

आपत्ये नानाने चरणावर मस्तक ठेऊन सिरसाष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ताा भाद्रपद बहुल दशमीपरियत वडिलाचे आसीर्वादे करून वर्तमान येथास्थित असे विशेष. दशमीचे दिवसीचे वर्त(मान). मी म्हटले की आज जेवित नाही. मातुश्रीबाई म्हणाली की दुसरियाचा लेक, बोलता येईना. इतकीच दशमीचे दिवसीची गोष्ट. याउपरी त्यामागे जे जे वर्तमान जाहाले ते लिहिले आहे. वडिली लिहिले कीं, तुम्ही उपास करावा ऐसा अर्थ नाही; असे लिहून पाठविले तरी मी जर निरशन येकादसी जर केली असेल तरी आण आहे. या उपरांतिक वडिली लिहिले की, वडिलानी बोलावे आणि तुम्ही संसावे; ऐसा अर्थ लिहून पाठविला. तरी वडिली येकदा बोलावे. सारा वेळ तेच गोष्ट, हे गोष्ट वडिला उचित नाही. मातुश्रीबाई याचे मनात आहे की मला जितके दिवस बालगले तितके बालगले, आता तो माझी गोष्ट आयेकत नाही; आता त्याला रायाबाकडे पाठविते, ऐसा गोष्टी जे मनुश्या येते त्याबरोबर हेच गोष्ट बोलावी ऐसा गोष्ट जाहली आहे. यानंतर वडील जर मला दसऱ्या अलिकडे सातारियास आणितात तरी बरी गोष्ट आहे. येथे तुम्ही जर असता तरी सर्व वर्तमान विदित होतो. आता वडील म्हणत असतील की "गोष्टी च्यार आमचे सामाधानास्तव लिहितो" ऐसे मनात न आणने. चिरंजीव रामचंद्र याजकरवी रायास कागद लिहिवणे; त्यावरून आमचे येणे होईल. बहुत काय लिहिणे? लोभ असो दीजे हे विनंती. चिरंजीव रामचंद्रास आसिर्वाद. हेच (पत्री) राजश्री बापूजी गणेश यासी नमस्कार विनंती. मातुश्रीनी ईस कागद

+ पत्राच्या अखेरचीं "हे आसीर्वाद" हीं अक्षरें खुद्द राधाबाईच्याच हातचीं असावीत. अक्षरें मोडींत आहेत व अक्षराचें वळण मोठें व सामान्य आहे.

लिहिला आहे त्यावरून सर्व वर्तमान कळो येईल. तुमचा मेहणा नारायेण यासी आमचा नमस्कार सांगणं. बहुत काय लिहिणं हे विनंती. मातु (श्री) जिऊबाई यासी साष्टांग नमस्कार. दया असो दिधली पाहिजे हे विनंती. चिरंजीव सदासिव सुखरूप आहे. काही चिंता न करणे हे विनंती. मातु (श्री) सौभाग्यवती मातुश्री ताईचे पत्री लिहिले आहे; त्यावरून सर्व वर्तमान विदित होईल. आपणहि काही साह्यता केली पाहिजे हे विनंती.

¶*Interesting letter by Nana Saheb to his mother: throws light on the domestic affairs of the family. Who is Bapuji Ganesh? Ramchandra Baji died in 1733: so the letter must be dated a little before then.*

*No. 7*] [*1734?*

**श्री**

श्रियासहस्रायु चिरंजीव राजमान्य राजश्री बाजीराऊ यासी प्रति मातुश्री राधाबाई आशीर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहित जाणें विशेष. मौजें जेजुरी येथील मुकामीं तुम्हास राजश्री स्वामीचीं पत्रें आलीं तें वर्तमान आम्हांस कळलें त्याजवरून विश्वतामुखीं त्याचे भेटीस न जावें. राजश्री रंभाजी निंबाळकर व तुरुज ताजखान याची भेट जालियानंतर भेटीचा मनसुबा मोडला तर बहुतच उत्तम आहे, नाहीं तरी तुम्ही विचार करून भेटीचा मनसबा मोडे ते गोष्ट करणें. तुम्हास भेटीचा मनसबा मोडावयाचा विचार कीं, राजश्री आनंदराऊ सोमवंशी सरलष्कर व शंभुसिंग जाधवराव हे दोन्ही सरदार बरोबर नाहीं (त) आणि आम्ही येकलेच यावेसें काय आहे? ऐसें राजश्री आनंदराऊ सुमंत यांस सांगोन भेटीचा मनसुबा मोडे ते गोष्ट करणें. बहुत काय लिहिणें हें आशीर्वाद.

¶*Radhabai warns Bajirao not to go and visit (the Nizam?) in the absence of Anandrao Somvanshi and Shambhusing Jadhao.*

*No. 8*] [*4-1-1721*

**श्री**

श्रियासह चिरंजीव विजयीभव राजमान्य राजश्री बाजीराऊ यांप्रती राधाबाई अनेक आशीर्वाद उपरी. येथील कुशल पौष बहुल त्रयोदशी जाणून स्वकीये क्षेमलेखन करवीत आसिलें पाहिजे. विशेष, सांप्रत आज पंधरा दिवस तुम्हाकडील वृत्त कलत नाहीं याजकरितां चित्त सचिंत आहे. तरी साकल्य वर्तमान अक्षरशः

लेहून पाठवणें. तेणेंकरून चित्तास समाधान होईल ; तरी सविस्तर लिहिणें. येविशी अनमान कराल तरी माझ्या गळ्याची आण असे. बहुत युक्तीनें मनसुबा करून येणें. येविशीं अनमान न करणें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

¶*Radhabai's letter to Bajirao to communicate to her full details of his doings.*

---

*No. 9*] [*1734*

**श्री**

सेवेसी विज्ञापना. इंग्रजाच्या सरकारात साल गुदस्तांपैकीं सकलाद होती. ते हाली लिलांव करून सावकारांस दिल्ही. सकलाद ससती विकली. त्यांत सकलादी गालिचे मुजर्नावजा वेलदार हिरवे पिवळे लाल बहुत वेश खुशतऱ्हा, येक गालिचा येक तक्या तेच वजेचा, त्यास जोडा म्हणतात, येक गालिचा येक तक्या येकून जोड्यास सवा अठरा रुा किंमत लिलावांत जाहाली. याजवरी कोण्ही चढेना. याजकरितां यथास्थित किंमत न होय यास्तव इंग्रजानी ठेविले. त्यापैकीं सदरहू किंमतीनें वीस पंचवीस जोडे कोणा कोणास दिल्हे आहेत. गालिचा लांब अडीच वार रुंद दोन वार याप्रा आहेत. तऱ्हादार जिनस दृष्टीस पडला व मोरो विश्वनाथ यांणी दोन जोडे घेतले आहेत. सरकारांत खपतील तरी लेहून पाठवणें म्हणोन सांगितले. त्यावरून लिा आहे. विदित होणें हे विज्ञापना

¶*Bajirao's agent at Bombay writes to him regarding broadcloth and carpets to be had there.*

---

*No. 10*]

**श्री**

सेवेसी विज्ञापना. मेस्त्र सिलवान इंग्रज याचे घरी विलोरी दिवे झाडाचे मज्यालसीत बसकेवरी ठेवावयाचे व फानसवजा टांगावयाचे येसे बहुत वेश दोनसे रुपयांचा जोडा यापासून आठसें पावेतों जोडा येसे तऱ्हेतऱ्हेचे आहेत. मुजरद आम्हांस वखारेंत नेऊन दाखविले. तसेच थोर आरसे अडीच पावणेतीन हात लांब व दोन हात रुंद वरते काम मुलामगिरी बहुत वेश, साल गुदस्तां विलायती ज्याहाजे आलीं होतीं त्यापैकीं. सरकारांत खप असला तरी लेहून पाठवणें म्हणौं इंग्रजाने सांगितले. त्यावरून सेवेसी विदित व्हावें याजकरिता लिा आहे. जडाव हिरे यांचे घड्याळें लहान सोन्याचें येसे येक उतम आहे. त्याचें

वृत्त व हिऱ्यांचा सुमार पेशजी जासुदांबराबर लिा आहे त्यावरून विदित होईल. यासिवाय दिवसाचें आकाश पाहावयाचे येक यंत्र पोटरी येवढें मोठें नळीवजा आहे. त्यांतून आकाश दिवसाचें पाहिलें म्हणजे जे आकाशांत जे आहे ते दिसतें येसें सांगतों. ते यंत्र आम्हास दाखविलें घरांत, परंतु बाहेर नेऊन आकाश दाखविलें नाहीं. दाखवीन येसें बोलला तों त्यांची दरबारास जावयाची घटका भरली तसा उठून गेला. आम्ही आपल्या घरास आलो. फिरोन साक्षप करावा तो केला नाहीं. सेवेसी कलावें यास्तव लिा आहे. आज्ञा होईल त्याप्रा वर्तणूक करून. विदित होणे हे विज्ञापना.

¶*An agent of the Peshwa at the Bombay market refers to lamps, large mirrors, a watch studded with jewels, etc.*

*No. 11*] [*14-2-1735*

**श्री**

**मातुश्री बाई यासी**

अपत्ये चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल तागायत फाल्गून सुध त्रितीया भृगुवार संध्याकाळ. तुमच्या आसीर्वादें करून सुखरूप असो विशेष. चिरंजीव सदासिवास पाठवावयाचा विचार आपल्यासी बोलून आलो होतों. त्यास विचार पाहातां चिरंजिवास सवाई जयसिंगाचे घरीं बहुमान होईल हा येक अर्थ; वरकड[1] चिरंजिवाचे यात्रेचे दिवस हे आहेत येसे नाहीं. बहुमानाची गोष्ट म्हणावी तर तुमच्या आसीर्वादें आम्हांस काये न्युन्य केलें आहे ? दोन पर्याय तों या प्रकारचे आहेत. परंतु तिसरा पर्याय तुमची आज्ञा, क्षेपनिक्षेप पाठवावें येसीच असली तर लक्षप्रकारें पाठऊन देऊं. तुमच्या समाधानापेक्षां आम्हांस दैवत दुसरें नाहीं. तुम्हीं यात्रा करावयास जातां, देवधर्म तीर्थ करावयास चिरंजीवाचा पायगोवा[2] होईल येसे आहे. आपण तुमचा निरोप घेतला ते समई आपण पाय उतारा तुमचे पालखीसमागमें घटकाभर येऊन मग निरोप घेऊन यावें येसें होतें, परंतु ते समई चितांत आलें नाहीं यामुलें चित्तांत आलीकडे आलियावर हळहळ वाटली. आपलें समाधानपूर्वक आसीर्वाद पत्र आलें म्हणजे चित्तांतील हळहळ दूर होईल हे विनंती. छे[+] २ सवाल दुपाहार.

¶*Chimaji Appa's letter to his mother Radhabai, shewing the most affectionate reverence for her. The lady was proceeding on a pilgrimage and wished to take with her Sadashivrao Bhau, then only five years old.*

---

१ एरवीं; नाहीं तर. २ म्ह. मुलाची तुम्हांस अडचण होईल.

+ सदाशिवराव या वेळीं ५ वर्षांचा. सबंध पत्र चिमाजीच्या हातचें.

No. 12] [18-5-1735

छ ८ सफर

श्रीउमाशंकर

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामी तथा राजश्री

आपा स्वामीचे सेवेसी

पोष्य बाबूजी जोशी साष्टांग नमस्कार विनंती उपरीचें बातमी वर्तमान स्वामीचे आशीर्वादें करून मुकाम नाथद्वार ज्येष्ट शुद्ध ८ रविवार पावेतों मातोश्री संनिध सुखरूप असों विशेष. बडवाईहून वैशाख शुद्ध ७ शुक्रवारीं निघोन वैशाख वद्य १० स उदेपुरास आलों. आठ दाहा दिवस राणाजींनी आपलें संनिध ठेऊन मातोश्रीचा सन्मान उत्तम प्रकारें केला. माहालांत मातोश्रीस नेली. राणाजी मातोश्रीचे दर्शनास माहालांत गेले. मोत्यांची माळ १ पदक १ व हातचे सोन्याचे चुडे किंमत तों माफक परंतु जनांत बहुमान हेंच गोष्ट थोर आहे. हत्ती छावा १ ५००० रुपये खर्चास. बिहारीदास[1] यांनीं १००० येक हजार नजर केली. राणाजीचें चित्तांत बहुमान फारसा करावा असा हेत होता; परंतु बिहारीदास यांस नूतन सेवा प्राप्त जाली यामुळें स्वामीस किफायत करून दाखवितात ! आम्हांसहि ईश्वरें काय वाण केली? रंग राखून निरोप घेऊन आलों. दरमजलां सत्वरींच जयपुरास जाऊन सवाईजीची भेटी घेऊन सत्वरींच पुढें जाऊं. विशेष पश्चाचें वर्तमान स्वामींनीं सदाशिवपंत यांस राणाजीकडे पाठविलें. राणाजीचें आर्जव उत्तम प्रकारें राखून पुढें दबाव दाखऊन कार्य करावें. त्यावरून आपले सरदारांस पत्रें अंतस्तें लिहिलीं त्यांचें उत्तर त्यांनीं काय लिहिलें तें स्वामीस विदित जाहालें. स्वामींनीं सरदारांस उत्तर लिहिलें तों दिवस आखर जाला आणि बिहारीदास लष्करांत होते तेथें रामचंद्रजींनीं पष्ट सांगितलें कीं सदाशिवपंतास निरोप देणें. पुढें हंगामवर आम्ही येऊं ते समयीं तुमचें आमचें विचारें पश्चाचें काम करणें तें करूं. येक दबाव देऊन कार्य करावें तें न केलें. दुसरी फिसाद केली यामुळें च्यार दिवस काम तटलें. याजकरितां स्वामींनीं बिहारीदास यांस व राणाजीस पत्रे पाठवावीं कीं बारा वरषें आपण तुमची सेवा केली. अद्याप..........चें कार्य होऊंन ये [अपूर्ण]

¶*Radhabai's reception at Udepur when she went on a pilgrimage.*

1 Diwan of Udepur.

No. 13] [पौा 19-12-1735

पौा छ १९ साबान.

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा स्वामी वडिलांचे सेवेसी विनंती. मातुश्रीबाई प्रयाग करून कासीची यात्रा करून गयेस सुखरूप पावली म्हणून स्वामींनी लिहिलें त्यावरून बहुत हर्ष जाहला तो पत्रीं लेहावें येसें नाहीं. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Nana Peshwa to Chimaji : he rejoices to hear that Radhabai has arrived safe at Gaya on her pilgrimage.*

No. 14] [5-1-1736 ?

श्री

श्रीमंत राजश्री पंत
प्रधान स्वामींचे शेवेसी

पोष्य वासुदेव जोसी साष्टांग नमस्कार विनंती. ताा माघ शुध ३ पावेतों जाणून स्वकीये लेखनआज्ञा केली पाहिजे विशेष. आम्ही श्रीयात्रेस तीर्थश्वरूप मातुश्री बाईसमागमें गेलो होतो ते यात्रा करून पौश वद्य चतुर्दसीस घरास आलो. येथें आलियावर स्वामींचे पत्र आले की, राजश्री स्वामीचे येथे लग्न आहे. तर पालखिया पाठऊन देणे; म्हणून आज्ञा. त्यावरू[न] पालखी व भोई आा १० येसे पाठविले आहेत. पावतील. चिरंजीव पांडुरंग जोसी थेवरास गेले आहेत. तेहि येका दो दिवसी आपणाकडे येणार आहेत. कलले पाहिजे. बहुत काये लिहिणे लोभ करीत गेले पाहिजे. हे विनंती.

¶*Vasudev Joshi to the Peshwa, returning from his pilgrimage to Benares whither he had accompanied Radhabai.*

No. 15]

श्रीरामप्रा

पु॥ रा चिमणाजी पंडित आपा
स्वामी गोसावी यासी

विनंती उपरी. नवाब पुसत होते की राजश्री चिमणाजी पंडित यांचे घरी शादी जाली ते कोणाची? आम्ही सांगितले की पुत्राची मुजी जाहाली. बेटा

कैसा आहे? आम्ही अर्ज केला बहुत माकुल आहे. त्यावरी खुदा म्हणून त्रिवचन बोलिले. यैसियास आपले घरी वृतबंध जाहला त्याचे वर्तमान सर्वास कळल. नवाबासहि कळले. याकारितां वस्त्रें उतम नवाबास नजर पाठविली तरी उतम आहे. पाठवावी. आपली पत्रे थैली पाठवावी. आम्ही गुजरानून उतर पाठऊ. नवाबहि आपणास पाठवितील. याचा विशय फार आहेसे नाही. आगत्यरूप हजार रुा मधे मोईन आहे अनमान न करावा. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

¶*Chimaji Appa is requested to send robes of honour to the Nizam on account of the thread ceremony of his son Sadashivrao.*

*No. 16*] [*April 1736?*

श्री

चिरंजीव बाजीराव बलाळ प्रधान यांप्रति नारायण दिक्षीत पाटणकर याचे अनेक आशीर्वाद उपरी. येथील क्षेम चैत्र वद्य ११ गुरुवार जाणोन आपलें कुशल सविस्तर लिहीत जाणें तेणेंकरून समाधान होईल विशेष. तुम्हीं यंदा जयनगर प्रांतास आलेत म्हणोन आयकिलें त्यावरून असें चितामध्यें आलें परराष्ट्रामध्यें येणें हे अत्यंत दुसह आहे परंतु श्रीविश्वेश्वर त्याचाहि निर्वाह करणार समर्थ आहे. यानंतर निजामाचा तुमचा युधास आठ वर्षे जाहालीं. त्या समयामध्येंच आम्हास साक्षात्कार जाहाला होता त्यावरून पन्नासावा वांटा व दाहा गांव इश्वराचे आज्ञेने लिहोन घेतले होते तर आतां तुम्ही या प्रांतास आले आहा. राजा अत्यंत प्रतारक आहे. तुम्हास अग्निहोत्र करा ऐसें म्हणेल अथवा यज्ञ करा ऐसें म्हणेल तर तुम्हीं त्यास म्हणावें कीं आपल्या गुरूचा आज्ञेव्यतिरिक्त कर्तव्य नाहीं व आपले परंपरा ऋत्विज्यहि त्या प्रांती आहेत. यानंतर तेथे प्रतारक शुद्र याजक आहेत ते कदाश्चित राजास सांगोन तुम्हास भुलवितील, आणखी तुम्हीं हें कर्म कराल तर आपण प्राणत्याग करीन. यानंतर आर्त्विज्यहि जें आहे तें आपल्या ज्ञातिव्यातिरिक्त अणखी कोणास देऊं नये. अणखी परराष्ट्रामध्यें येऊन अत्यंत सावध सदैव असिलें पाहिजे. विशेष राधाबाई गयायात्रा करून आली. नंतर आमचा घरास येऊन येक अतिरूद्र होमद्वारा करावा अणखी चित्तानरूप ब्राम्हणभोजन सहस्त्र दोन सहस्त्र करावा त्यास आमचा घरीं येक अतिरूद्र व ब्राम्हण भोजन व अणखी अनाहूत ब्राम्हणी बायका आदिकरून सर्वांस येकक पातळहि देविलें तर जात्येसमई व स्त्रीसाठीं येक सहस्त्र रूपये दिल्हे परंतु दोन सहस्त्र

रूपये लागतील. यानंतर तेथें होतों तेव्हां क्षणा क्षणा हरिभटास पाठवित होतों. निजामाची तुमची भेटि जाहाली तेव्हां हरभटासच पाठविला होता. अणखी कोंकणात गेले होतेत तेव्हांहि त्यासच पाठवित होतों. आतां चिरंजीव राम दीक्षित तिलक हे जसे वासुदेव दीक्षित तसेच हे आपणास आहेत. या नंतर कदाचित राजाचा संकोच पडला तर वाजपेयांत अनुष्ठानाचा निर्वाह करीत असे ऋत्विज पाठविले आहेत परंतु आपले स्वसैन्य टाकून येक घटका कोठे न राहाणें. राहाल तर तुम्हास माझा शफत आहे. अग्निहोत्रादिक अनुष्ठान आहे ते सावकाशपणाचे आहे यास्तव लिहिलें असे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

¶*Narayan Dikshit Patankar to Bajirao: advises the latter to perform religious sacrifices only through Deccani priests. The letter is interesting as exposing a phase of Maratha expansion controlled by such persons as the writer.*

*No. 17*] [*May 1736*

श्री

पुरवणी[+] तीर्थरूप राजश्री राऊ व

तथा राजश्री आपा स्वामीचे सेवेसी

विनंती. राजश्री प्रतिनिधीनी च्यातुर्मास्य केली व पशुयेज्ञहि केला. वैशाख शुध पूर्णमेस अनुस्टान समाप्त जाहालें. स्वामीस कलावे याकरिता लिहिले असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Pratinidhi performing sacrifices and vows.*

*No. 18*] [*9-6-1736 ?*

पा। छ १० सफर

श्री

पु॥ राजश्री चिमाजीपंत आपा

गोसावी यासी

विनंती उपरीं. राजश्री राऊ याजकडील काये वर्तमान, कोठे आहेत, काये मनसबा योजिला आहे, तिकडे छावणी होणार किंवा देशास येणार, ते

---

+ पत्र महादाजी अंबाजीचें.

लिहिले पाहिजे. राजश्री बाजीराऊ व चिरंजीव राजश्री आपा याजकडील लस्कर कोठे आहे, काये विचार केला, त्याचे पत्र आले आसेल ते लिहिले पाहिजे. मातुश्री बाई माहायात्रेहून टोकियापर्यंत आली म्हणून वर्तमान राजश्री दादोबा याणी सातारियाहून लेहून पाठविले होते. येैशास मातुश्री बाई याची आपली भेटी जालियाचे वर्तमान लिहिले पाहिजे. विशेष काये लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनंती.

*¶Letter to Chimaji Appa, inquiring whether he met his mother on her return from the pilgrimage.*

*No. 19]* *[1-5-1737 ?*

पौ छ १३ मों

**श्री**

चिरंजीव राजश्री नाना यास चिमणाजी बलाल आसीर्वाद उपरी. येथील कुशल ताा छ ११ मोहरम यथास्थित असे विशेष. मातुश्रीबाई समुद्रस्नान करणे आहे म्हणून पावसाला बोलली होती. याकरिता अमवाशे आलीकडे च्यार दिवस येथे पावणे म्हणजे अमवाशेस स्नान करून स्वार होऊन जाणे. आम्ही जेस्टी पौर्णिमा होताच निघोन येऊ येसे मातुश्रीस पत्र लिहिले आहे. मातुश्रीच्या विचारे यावेसे असले तर रवानगी करणे. सौभाग्यवती मातुश्री कासीबाई वहिनीचा पाय बरा जाला असला आणि त्यांच्या विचारे समुद्र स्नानास यावेसे असले तर त्यासहि रवाना करणे. ती आली म्हणजे जनार्दन, रघुनाथ, सदाशिव त्रिवर्गहि येतील. जर त्याच्या पायाचे दुख बरें जालें नसलें आणि त्यांच्या विचारें तूर्त यावेसें नसलें तर त्यांचें राहणें होईल. त्यांचें राहणें जालें तर जनार्दन त्यांजवळ राहील. रघुनाथ, सदाशिव यांस मातुश्रीसमागमें पाठवणें. मातुश्रीच्याहि विचारें तूर्त यावेसें नसलें तर कोणासहि पाठवावयाचें प्रयोजन नाहीं. हे आर्शावाद.

*¶Chimaji Appa, all in his own hand, writes this letter to Nana asking him to send his mother Radhabai for sea-bathing, with the little boys Raghunath, Sadashiv and Janardan.*

No. 20] [11-11-1737 ?

छ ६ साबान

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे सेवेसी.

आज्ञाधारक रघुनाथ सिवराम सां नमस्कार विज्ञापना. स्वामीचे कृपाकटाक्षे-करून शेवकाचे वृत यथास्थित असे विशेष. स्वामींनी माहादाजी व माणकोजी जामूद दिा म्हसाजी नाा यासमागमे आज्ञापत्र सादर केले. तेथ आज्ञा की, बिदरी हुका १ व बिदरी पिकदानी १ पाठऊन देणे. ऐसीयास थेट बिदरी पिकदानी चागली मिलत नाही. हुका, पूर्वी आणखी कितेक सामान काहारा-समागमे पाठविले आहे त्याजमध्ये पाठविला आहे. सिरोजी ग्वारेव पावणे तीन रुा प्रा मिलू लागले. याजकरिता फार माहाग म्हणून पाा नाहींत. सेवेसी विदित जाले पाा. हे विज्ञापना. मिती कार्तिक वदी ३० शुक्रवार.

हे विनंती.

¶*Raghunath Shivram to the Peshwa : sends a tobacco pipe and a spitcon.*

No. 21] [14-11-1731 ?
[26-11-1738 ?

श्री

चिरंजीव राजश्री बाजीराऊ यासि प्रती राधाबाई कृतानेक आर्सीर्वाद उपरी येथील कुशल कार्तिक बहुल एकदसी जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. "हाकाटी न करितां विचारे करून साहित्य कर्तव्य ते करावे व आईतेसमई दाहा हजाराची सामग्री होईल व मिलेल संकट नाही. आहे अर्थ तो कलतच आहे. अनकूल प्रतिकूल हा अर्थ लोकास काये कले? हाकाटीने जन मिले लौकिकासारिखे संपादावे लागेल, यास्तव लक्ष प्रकारे हाकाटी न करणे. गुप्तरूप होईल ते करणे. वरकड आईतेसमई करणे" म्हणून कितेक लिहिले ते कलले. तुम्ही लिहिलेत त्याचप्रा आम्ही करून. हाकाटी सर्वथी करणार नाही. आनकुलता नाही हा अर्थ आम्हीच तुम्हास लिहिला होता व लग्न करितो न करितो हे घरात चर्चा केली नस्ता तुम्हाजवल कोणी काये सागितले असेल ते न

+ Made at Beder.

कले. वरकडहि लोक काये म्हणतात तेहि न कले. जन विरुध आहे, ज्याचे चितास जे येते ते तो म्हणतो. आपण विचार लिहिला तो युक्तच आहे. आम्हास विचारास आला. नारो भिकाजी यांचे कन्येचे नेमस्त करावयास रा रामचद्र जोसी नेरकर पाठविले होते, त्याणी नेमस्त केले. मूल देतात. माणसे पाठऊन आणावी इतकाच अत्र ठेऊन पत्र व जासूद पाठविले ते काल सनवारी संध्याकाली आले. तुम्हास कलावे याम्तव लिहिले असे. टोकियासहि धोडभट पाठविले आहेत. लग्नास आठ रोज उरतील तसमई मुलीस आणऊन. कलले पाहिजे बहुत काये लिहिणे हे आसिर्वाद.

¶*Radhabai discusses some matrimonial affair with her son.*

*No. 22*] [*1738?*

## श्रीभार्गवराम

### श्रीमत् परमहंस स्वामी याही

सहश्रायु चिरंजीव बाजीराऊ प्रधान यासी आज्ञा केली येसी जे. येदाचे समाधी आम्हास कठीण गेली. त्या दिवसापासून शरीर आशक्त जाले आहे. आपा जोसी याजबराबरी निरोप पाठविला होता, त्या गोष्टीचे आपण काही आशंका न धरणे. तुम्ही सुखरूप आसलेत, भार्गवे तुमचे कल्याण केले, म्हणजे सर्व पावले. आमचे चालावे तेसे चालेल. तुमचा कागद अंतोबाबा आला. तुमचे निष्ठा देखोन व श्रीजवल प्रतरणा नाही * * कडून संतोषी जालो. तुमचे बऱ्यावर येक भार्गव किंवा काही राजा आहे. वरकड आवघे तुझठाई बरेच आहेत! याजकरिता सर्व प्रकारे तुझे कल्याण व्हावे, हेच आम्ही श्रीपासी नित्यकाल मागत. तुम्ही सुखी आसले म्हणजे भार्गवसेवा करालच, येसा श्रीसहि भरवसा आहे. तुमचे पदरी श्रीदयेने महदकार्ये तीन येश पडली. कोणती म्हणाल तरी, येक सैदाचा सला केलात, येक दिलीस गेलेत आणि कालीच मोगल बुडविलात. समारंगनी चालीस हजार घोडा सिवाजीजवल होता. परंतु कोठे समोर मोगलासी युध केले? ते गोष्ट तुम्ही केलीत! सामान्य येश श्रीने तुमचे पदरी घातली, यैसे नाही. पुढेहि श्रीदयेने येसीच येशे तुमचे पदरी पडतील. साप्रत राज्याने तुमचेठाई अकृपा धरिली आहे, म्हणून आइकिले. तरी तुम्ही वोढूनच धरणे. रागाखाली येणे. पुढे निदानी आ(म्हा)सारखे असोन, तुम्ही आमचे म्हणविता; तव्हा आम्ही सर्व तपशा समाधीचे श्रय भरीस घालून, राजा तुमचे घरास येऊन, तुमचे समाधान करी, येसेच भार्गव करील. हे गोष्ट होये

तोवर, आम्ही गोमुत्र घेऊन तरी, तुझ्या गल्याचे आण आसे; जाणिजे. जलवा आणिल्या होत्या त्या पाठविल्या आ(हेत). जलवा सुमार ५३ पा आहेत. घेतले पाहिजेत. विदित जाले पाहिजे. हें आज्ञा. ताब्राचे युधाचे पत्र तुमचे, येलोजी पडवल घेऊन आला होता. त्याजवल तुम्हास श्रीचे भोगवस्त्र, प्रसाद दुलई पा होती; ते पावली की नाही ते लिा पाहिजे. जाणिजे.

¶*Brahmendra Swami to Bajirao. Extols him beyond measure as having to his credit achievements superior to those of Shivaji, who, the Swami says, never fought the Mogul openly.*

*No. 23*] [*28-2-1739 ?*

पो। ३ जिल्हेज.

**श्री**

**तीर्थस्वरूप मातुश्री बाई वडिलाचे सेवेसी**

आपत्यें चिमानें साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल तागाईत फाल्गुन बहुल अमावास्या मुकाम ठाणें वडिलाचे आशीर्वादें करून येथास्थित असें विशेष. वडिलीं आशीर्वाद पत्र पाठविलें तें पावोन संतोष जाहाला. राजश्री सुलतानजी रायेजादे यांचा मजकूर लिहिला तो कळला. त्यास वस्त्रें देऊन निरोप द्यावयाचा होता; परंतु कारकुनांनीं आपला निरोप त्यास सांगता तफावत पडली. असो. त्यास आपण काय करितील? आम्हास यावयाविशी दोनतीन पत्रें विशदें पाठविलीं त्यास येथील आहे अर्थ तो विस्तारयुक्त वडिलास लेहून पाठविला आहे त्याजवरून अवगत जाहालेंच असेल; व चिरंजीव राजश्री नानायांस पाठविलें आहे त्याचे आपले भेटीनंतर सविस्तर कळेल. वरकड वडिलीं मजकूर लिहिला तो येथार्थच आहे. शरीरापेक्षां अधिकोत्तर नाहीं खरेंच. परंतु अडचणीच्या प्रसंगास कैसें करावें? येथील बंदोबस्त करून अविलंबेच येऊन विदित जाहालें पाहिजे. सुलतानजी रायेजादे यास जेवावयास येक दोन वेळ घालावयाचें होतें. तैसेंच खर्चास वस्त्रें देऊन रवानगी करावयाची होती. त्यास बरें वाटेना, यास्तव ते कुडाळास गेले; त्याकडील कारकून येथें आला असे. जिवाजीपंत निरोप सांगावयास चुकले. त्याचा कारकून बोलाऊन आणून सांगितलें असतें तर तोहि निरोपास येऊन भेट घेऊन जाता. सारांश जिवाजीपंतापासून आळस चूक जाली. इकडील कांहीं लटकी खबर ऐकली असेल यास्तव जासूद

---

+ येथून अक्षर चिमाजीचें.

पाठविला तो पावला, यैसियास येथें कांहीं आवई जाली यैसें नाहीं. येक धारावी मात्र आम्ही येथें नसतां घेतली. तें वर्तमान तपशिलें पूर्वी लिहिलेंच आहे. नानासहि सर्व आवगत जालेंच आहे. ते सांगतील हें विनंती.

¶*Chimaji Appa to his mother, replying to her entreaty not to exert himself too much.*

*No. 24*] [*20-4-1739?*

**श्री.**

श्रियांसह चिरंजीव राजश्री चिमाजी यांप्रति मातुश्री राधाबाई आसीर्वाद. उपरी, येथील कुशल ता। चैत्र वद्य नवमी जाणून स्वकीये लिहित जाणें विशेष. मुलास खेलावयाचा जिनस बाहुली हस्तिदंती व कांचेची यैसी उतम असतील ती पाठऊन देणें. पूर्वी तांदूल व पोहे जिनस पाठविला त्याचा जाब आला नाही. तर जिनसाचा जाब पाठऊन देणे. तांदूल पाटणी व पोहे वगैरे जिनसाचे प्रयोजन असिले तर लेहून पाठवणे; त्याप्रा। पाठऊन देऊन. आवलकठीचे प्रयोजन असिले तर लेहून पाठवणे; त्याप्रा। पाठऊन देऊ. हा आसीर्वाद.

¶*Radhabai to Chimaji Appa, asking him to send toys for the children.*

*No. 25*] [*3-6-1739*

**श्री.**

**वेदमुर्ती[१] राजश्री अचलवैष्णव व उमानाथ पाठक**
**गंगापुत्र वास्तव्य श्रीकाशि यांप्रति**

प्रतीपुर्वक राधाबाई नमस्कार विनंति उपरि. आह्मी श्रीस यात्रेकारणें आलों ते समइं क्रोधसंवत्सरिं तुमचें पुजन करून तुम्हास हें पत्र लिहुन दिलें आहे. तरी आमचे चिरंजिव राजश्री बाजीराव व राजश्री चीमाजिआपा व आणखि आमचे वंशींचे कोण्हि येतेल ते तुम्हांस पुजतील. संवत १७८२ मीति पौश वद्य पंचमि. स्वस्ताक्षर माहादाजी अंबाजी श्री × ⋍ ⋍ ⋍

हे पत्र तुम्हांस मातुश्रीनी दिल्हे आहे. जर श्रीमाहाराणाजी व आणखी चौघां मातबरांची पुरोहितपणाची पत्रें तुम्हाजवल असलीं तरी हे पत्र मातुश्रीनी दिल्हे लेहून हे प्रमाण असें. त्यांची पत्रें नसिली तरी प्रमाण नसे. छ ७ रौवल सुा।

१ येथपासून × अशा खुणेपर्यंतचा मजकूर मूळ पत्रांत बाळबोधींत आहे, तो अस्सल बमोजिब नक्कल केला आहे. फक्त शब्द तोडून विरामचिन्हें पदरचीं घातलीं आहेत.

आर्बैन मयां अल्फ. शके १६६१ सिधार्थीनाम संवसरे. हस्ताक्षर बाबूराऊ राम फडनिवीस. याखेरीज तुम्हांजवळ अजितसिंग व कोटेवाले यांचें लिहिले असिले तरी हे प्रमाण असे. तिवांचीं पत्रें असतील तर आमचें प्रमाण असे.

¶*Radhabai appoints Umanath Pathak of Benares to act as the family priest to the Peshwas there, provided he has similar authorities granted to him by Maharanaji and Ajitsing.*

*No. 26*] [*8-5-1739 ?*

छ १४ सफर.

**श्री**

तीर्थरूप मातुश्री बाई वडिलांचे सेवेसी अपत्ये सा भिऊबाईचे[+] नमस्कार विनंती. येथील क्षेम ता वैशाख शुध येकादसीपावेतो वडिलांचे आसीरवादे करून सुखरूप आसो. यानंतर आम्हास यते समई चिरंजीव रा सदोबानी सांगितले होते कीं आपणाकरिता बनोसी तिवटे पाठवणे. त्यावरून बनोसी तिवट येक व केसरी येक यो दोन तिवटे चिरं(जी)वाकारणे पाठविली आहेत. त्यातून आपले चितास येईल ते चिरंजीवास देणे. कदाचित यातून येकहि आपले चितास न ये तरी जामदारखान्यामध्यें तेथें देऊन जमेस धरवणे. बहुत काय लिहिणे कृपा लोभ असो दीजे हो

¶*A personal letter of Bhiu Bai, daughter of the 1st Peshwa, to her mother.*

*No. 27*] [*26-11-1739*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी**

सेवक कृष्णराऊ माहादेव साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता मार्गसीर्ष शुध्ध सप्तमी इंदुवार स्वामीचे कृपेकरून यथास्थित असे विशेष. आपण चासेहून स्वार होऊन आलों. आजिचा मुकाम ब्राम्हणवाडें येथें आहे. स्वामीचे स्वारीची त्वरा असली तर येक दिवस मुकाम केला पाहिजे. तों आपण येऊन पोहचतों. सेवेसी विदित होय. गंगातीरी येक मुकाम अगत्य करावा. आपणहि त्वरेनच येतों. परंतु उंटास मोठी मजल निभावता नाहीं. म्हणून येक दिवस

+ बाजाजी विश्वनाथ पेशव्याची मुलगी.

अधिक लागेल. यास्तव लिहिलें असे. बहुत[१] काये लिहिणे. मुकाम करावयास आंतर कराल तर माझी आण आसे. लोभ आसो दीजे हे विनंती.

¶*Krishnarao Mahadev, brother-in-law of Bajirao, writes to him that he will visit him on the following day on the banks of the Godavari.*

*No. 28*] [*22-1-1740*

**श्री**

+आसीर्वाद उपरी रा। बाबूजी नाईक वोकार यांची मूल रास्ते याच्या मुलासी देणार म्हणून वर्तमान ऐकिले. त्यावरून रा। कृष्णाजी नाइकास व बाबूजी नाईक वोकार यास मातुश्रीबाईस ती मूल रघुनाथासाठी राहावणे यैसी पत्रे पाठविली आसेत. मूल रास्ते याच्या मुलास देणार नाहीत. रघुनाथाच्या लग्नास तीथ याच कार्यात योजली तर याच कार्याबरोबर तेहि कार्य करावे लागेल. जर तूर्त तीथ न योजली तर पुढे लग्न केले तर कार्यास येईल. परतु मूल चागली. हातची जाऊ न द्यावी यैसा रायाचा सिध्यात आहे. रा। बाबूजी नाईक जोसीहि मागून येथून येत आहेत. हेहि ते मूल रघुनाथासाठी राखून ठेवतील. छ ३ जिलकाद रास्ते याचा मूल येईल त्यास दुसरी मूल योजून लग्न करवितील हे आसीर्वाद.

¶*Chimaji Appa asks that the daughter of Babuji Naik Onkar should be reserved for Raghunathrao, and not married to Raste.*

*No. 29*] [ ?

**श्री**

×सेवेसी विज्ञापना. इमारतीची कामे नाचाचा दिवाणखाना व धरणे वगैरे नेमणुकेप्रो जलदीने तयार करणे म्हणोन स्वामींनी पत्रीं आज्ञा केली. ऐसियासी नाचाचा दिवाणखानियाचे काम जोती तयार करून जोडणी उभी केली * * * आज्ञेप्रो तयार होईल. हौदाचे काम चालीस लाविलें. थोरल्या दिवाणखान्यापुढील चौसोपीचे काम चालत आहे. तेहि तयार होईल. पर्वतीचे वाटेवर तल्याची माती भर बहुतेक टाकिली, वाट तयार होत आली. फरासखानियाचा सोपा तयार जाला. धरणाचे काम चालीस लाविले आहे. वरकडहि आज्ञेप्रमाणे कामे तयार होतील. सेवेसी[२] श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The Peshwa is informed about the progress of the extensions of his Palace, of the water-tanks on the road to the Parvati temple, etc.*

---

१ येथून अक्षर खाशाचें. + सबंध पत्र चिमाजीआपाच्या हातचें.

× पत्र नानासाहेबाच्या कारकीर्दीतील चुकीनें येथें दाखल झालें. २ येथून वळण निराळें.

No. 30] [6-1-1740 ?

श्री

आसीर्वाद उपर. वाटेस घोड्यावर बसोन राऊ चालत होते. तेव्हा येके गावचा पाटील भेटीस आला तेव्हा असावध होते. त्यामुले पाटलासी सहजात बोलले जे कोबड्याचे प्रयोजन आहे घेऊन येणे. काये बोलतो हा अर्थ चितात नाही. हे विचार मस्तानी जवलून निर्माण जाले असेत. ती पीडा जाईल तेव्हा पुण्यच प्राप्त होईल न होई येसे दिसत नाही. "राऊत लस्कराभोवते चौकीस ठेवावे इकडे राऊत येऊ लागेल तो धरून येखाद्याचे पारपत्य केले म्हणजे दुसरा कोणी येणार नाही" म्हणून लिहिले. येसियास ते गोस्ट कार्याची नाही यास्तव राऊत चौकीस ठेवले नाहीत. लस्करातून राऊत जाईल तो वोलखू येईलसे नाही. येसे असता लटका लौकिक करावा येसे नाही. तुम्हाकडील बोभाट मस्तानीने लिहिला तर तो लटके म्हणावयास आम्हास कार्यास येईल. छ १७ सवाल हे आसीर्वाद.

*¶Chimaji Appa writes to Nana asking what steps could be taken to prevent Bajirao from getting intoxicated and communicating with Mastani.*

No. 31] [12-1-1740 ?

श्री

चिरंजीव राजश्री नाना यास चिमणाजी बल्लाळ आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागाईत छ २४ सवाल शनवार संध्याकाळ यथास्थित असे विशेष. बाळोबानें आमच्या सांगितल्याप्रमाणें उत्तर रायास सांगितलें. त्याउपर त्यानी विचार केला जे, गडमुक्तेश्वराहून गंगोदकाच्या कावडी आल्या आहेत त्या जमा करून ठेवल्या आहेत. या उदकें आपण स्नान करावें, व आम्हांसहि स्नानास उदक देऊन स्नान जालियावर गंगोदक आमच्या हातावर घालावें. मस्तानी आणून देणें म्हणजे महिन्या दोचौमध्यें आपण प्राशनाचें सोडतों. बलकी * * * ? आजपासूनहि सोडतों ऐसें म्हणणें पडलें तर म्हणावें. याप्रमाणें बाळोबाजवळ आम्हास निरोप सांगणें ऐसें सांगितले. त्यावर फिरोन निरोप न सांगणें ऐसें सागून मना केले आहे. उद्यां परवा गंगातीरास गेलियावर हा विचार करावा ऐसा अर्थ चित्तांत असावा(सा) आहे; परंतु कशीहि क्रिया * (म)स्तानी * * (फाटलें) * * * सता साप्रत ये * *

· पत्र सबंध चिमाजी आपाचे हातचें बहुधा नानासाहेबास.

* * * * *. (त्यास)स धीर निघत नाहीं. लोक फटकाळ म्हणतात. आम्ही संनिध आहों ते शंका चितांत येऊन खोड सोडवत नाहीं; तेव्हां तिचा समागम जालियावर व आमचा सहवास दूर जालियावर आतांच्यापेक्षां अधीकहि करूं लागतील. क्रिया केल्याची शंका कोठून चित्तांत येईल? आहे अर्थ तो कळलाच आहे! राउत पाठवावयाची तजवीज आजपावेतों योजिली नाहीं. पूर्वी येका दोघांसी बोलले आहेत. आलीकडे चर्च्या राउताचे रवानगीची करीत नाहींत. तुम्हास तिकडे जावयाची निकड न लागती तर आणिक च्यार दिवस आजपावेतों घालविले तैसेच घालवावयास कार्यास येतें. आतां तिकडील जाण्याची लग्नघटका प्राप्त जाली आहे. इकडून राउताची रवानगी तों तूर्त होत नाहीं. एखादे समयीं अकस्मात करतील तर न कळे. जे समई रवानगीची चर्चा करूं लागतील ते समई येऊन सांगेन ऐसे बाळ्या म्हणत असतां. पारपत्य न करावें तर तुम्ही तिकडे गेलिया * * * * * * * * जाईल हे न कळे. (पुढील दोन ओळी फाटल्या). हे आशीर्वाद.+

¶*Chimaji seriously discusses with young Nana measures to prevent Bajirao from drinking and from committing other excesses.*

*No. 32]* *[21-1-1740*

श्री

श्रीमत राजश्री नाना स्वामींचे सेवेशी.

पोष्य गोविंद खंडेराव कृतानेक साष्टांग दंडवत प्रणम्य विनंती उपरी. येथील कुशल छ २ जिल्काद जाणोन स्वकीय कुशललेखन करीत गेले पाहिजे. यानंतर स्वामीनी राजश्री दादा यांस लिहिले की मेकारांविसी राजश्री स्वामींची मर्जी कैसी काय आहे ते राजश्री येशवतराव यांस व आम्हास पुसोन पुर्ता शोध करऊन लेहून पाठवणें. त्याजवरून हे वर्तमान माारानिलेनी[1] आम्हास सांगितले. ऐशियास राजश्री स्वामींची मरजी पाहाता ते वस्तु त्याजबराबर न द्यावी; ठेऊन घ्यावी; चौकी बसवावी; यांजमुळें राजश्री राऊ खटें जालें तऱ्ही करावें ऐसी नाही. त्याची वस्त त्यांस द्यावीं. त्याचें समाधान करावें. दुर्वेसनाचा मजकूर त्या वस्तूवर नाही. त्याच्या चितांस पश्चाताप होऊन टाकतील तेव्हाच जाईल.

+सबंध पत्र चिमाजीच्या हातचें.

१ मम्नानी ?

ऐसे असतां या वस्तूस अटकाव करून सखा तोडू नये ऐसी मर्जी आहे. येथील अर्थातर विदित व्हावें याजकरिता लिहिले असें. बहुत काय लिहिणें. कृपा असों दिल्ही पाहिजे हे विनंती.

¶*Govind Khanderao Chitnis to Nanasaheb Peshwa, telling him what course King Shahu advises to be taken with regard to the Mastani affair. It is only repentance, the King says, that will improve matters and not any kind of restraints imposed on Mastani.*

*No. 33*] [*29-3-1740*

**श्री**

चिरंजीव राजमान्य राजश्री नाना यास चिमणाजी बल्लाळ आशीर्वाद. उपरी येथील कुशल तागाईत छ ११ मोहरम शनवार जाणून स्वकीयें लिहीत जाणें. विशेष. राजश्री बापूजीराव मल्हार व राजश्री चिमणाजी भिवराव यांचीं पत्रें आलीं त्याच्या नकला करून तुम्हाकडे पाठविल्या आहेत त्यांवरून सविस्तर वर्तमान कळेल. तीर्थरूप राजश्री राऊ स्वामी छ १९ जिल्हेजीं गेले त्यादिवसांपासून आज पावेतों आम्हास पत्र लेहून पाठविलें नाहीं. त्यांची आमची (फाटलें) * * * * * * * * र्थ नाहीं. जेथपर्यंत आमचा यत्न चाले तो केला; परंतु ईश्वराचे चित्तास नये. त्यास आमचा उपाय काय आहे? त्यांचे प्राक्तनीं जें असेल तें सूखरूप होऊ. आपण निमित्य घ्यावें ऐसें नाहीं. यास्तव आज आम्ही निंबदेव्हाऱ्याचा घाट चढलों. दोहो तिही दिवसां पुण्यास जाऊं. पुण्यास गेल्यावर तिची रवानगी त्यांजकडे करावी, आपलें निमित्य वारावें. त्याचे प्राक्तनीं असेल तें होईल, ऐसा विचार केला आहे. याचें उत्तर सत्वर पाठऊन देणें. तीर्थस्वरूप राजश्री राउ स्वामीस आम्ही लेहून पाठविलें आहे कीं आपले शरीरीं समाधान नाहीं. यास्तव स्वारीस जावें, ऐसा अर्थ नाहीं. घरास यावयाचा विचार करावा म्हणोन लेहून पाठविलें आहे. त्याचे विचारास येईल तसें करतील. त्यास आमचे लिहिण्याचें पथ्य आहे ऐसें नाहीं, हे[1] आशीर्वाद.

¶*Chimaji to Nana, communicating his despair of curing Bajirao of his evil ways.*

---

१ शेवटचे दोन शब्द लेखकाच्या हातचे.

No. 34] [1740 ?

श्री

चिरंजीव राजमान्य राजश्री आपा यांप्रती राधाबाई आसीर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वर्काये कुशल लिहीत असिले पाहिजे. विशेष, चिरंजीव राजश्री राव याजपासी बहुत युक्तीच्या विचारें जो विचार करणे तो करून येणे. चालीवरी नजर देऊन जे कर्तव्य ते करावें. बहुत काये लिहीणे हे आसिर्वाद.

¶*Radhabai's letter to her son Chimaji Appa, asking him to remonstrate with Bajirao about his ways and arrange matters, presumably as regards Mastani.*

---

No. 35] [28-12-1739

पौ छ ११ सवाल.

श्री

तीर्थरूप मातुश्री बाई वडिलांचे सेवेसी अपत्यें चिमाजीनें साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम ताा छ ८ सवाल पावेतों समस्त सुखरूप असों विशेष. सिवाजी कृस्ण यास नासिकास चिरंजीवास नोवरी पाहावयासी पाठविलें होतें तो आला कीं नाहीं, काय वर्तमान तें लेहून पाठविलें पाहिजे. माघ मासीं लग्न व मुंजी नेमिली आहे. ऐसियास, राजश्री स्वामी जेजुरीस माघ मासीं येणार. त्यांचे साहित्य केलें पाहिजे व घरचेंहि साहित्य जाहालें पाहिजे. दोन्ही साहित्यें येकदांच होणार नाहीं. यास्तव वैशाख मासीं लग्नाचा व मुंजीचा मुहूर्त आहे कीं नाहीं ते मनांस आणावें. वैशाख मासी मुहूर्त असिला तरी वैशाख मासीं करावें, म्हणजें माघ मासीं राजश्री स्वामींचे साहित्य होईल. तदनंतर वैशाख मासीं घरचे साहित्य होईल. आपले विचारें माघ मासींच उरकून घ्यावें ऐसेंच असिले तरी साहित्य जसें होईल तसें होऊ. बहुत काये लिहिणे, कृपा केली पाहिजे. रायासीहि च्यार गोस्टी नर्मतेनें बोलणे तैशा बोललों. सांप्रत पहिल्यापेक्षा बोलून चालून भोजन करून सुखरूप आहेत. देवाची दया आहे तर दिवसेंदिवस संतोषीच होत जातील. चितात मात्र येध आहे तो कललाच आहे. सविस्तर नानाहि सांगतील त्याजवरून कलेल. हे विनंती.

¶*Chimaji Appa to his mother regarding the marriage of Sadashivrao and the thread ceremony of Raghunathrao. Adds "I have humbly remonstrated with Bajirao. He is now in much better spirits, and God willing, he will daily grow more cheerful. But I am afraid however he is ill at ease on one account (Mastani)."*

No. 36]

श्री

राजश्री बाजीराऊ पंत प्रधान
साहेबाचे सेवेसी

॥ सेवेसी विनंती. साहेबापासून आलियावरी येथे सुखी असो, व साहेबाचे हुकुमाप्रमाणे वर्तणूक केली. त्यास साहेब प्रदेशामधे गेल्यामुळे काही समाधान नवते. त्यास साहेब दिगविजये करून आपले स्वस्थलास आले, त्यावरून परम समाधान जाले. यानंतर साहेबापासी मस्तान आहे त्यावरून आम्हासहि समाधान आहे. यामधें काही अनमान असल तरी साहेबाचे पायाची आण आहे. आमचा काही परामर्श न केला. साहेब थोर आहेत. आम्ही विनंती लेहावी यैसा काही अर्थ नाही. परंतु लौकीक बहुतसा जाला आहे कीं आम्हा पासून पोरी हिरोन घेतली यैसा विचार जाला आहे यैसे न कीजे. दोनी महिने पाठऊन दीजे. मागती सेवेच पाठऊन देऊन. आपण साहेबाची जोड केली आहे आणि आम्हास पायापासी बोलावाल तरी सेवेसी येऊन. आमची फिकीर साहेबास आहे. सेवेसी तुकोजी पाठविला आहे. विनंती करील त्यावरून विदित होईल. विशेष काय लिहा हे ( विनंती. )

¶*The writer tells Bajirao that he is happy to see him living with Mastani. Whether this Mastani means Bajirao's mistress Mastani is a question. The origin of Mastani is yet undetermined and hence the importance of this letter.*

*The whole letter is in one uniform old Modi handwriting.*

No. 37] [23-3-1740

छ ९ मोहरम

श्री

तीर्थस्वरूप मातुश्री बाई
वडिलांचे सेवेसी

आपत्यें बाजीरायें साष्टांग नमस्कार विनंति. येथील वर्तमान तागायत छ ९ मोहरम मुकाम शाहापूर नजिक बराणपूर वडिलाचे आसीर्वादें येथास्थित असे विशेष. वडिलांचे आसीर्वादपत्र आलें तें पावोन संतोष जाला. यैसेंच सदैव पत्र पाठऊन सांभाळ केला पाहिजे. ऊष्ण काल आहे, चिरंजीव राजश्री रघुनाथ व जनार्दन समागमें आहेत त्यांचा परामर्ष करीत जाणें म्हणून लिहिलें, यैशास

उभयतां सुखरूप आहेत. आपणांस कलावें याजकरितां लिहिलें असे. प्रस्तुत कोंकणांतील हवा जबून आहे. चिरंजीव राजश्री आपा यास * * मध्यें बाहेर जाऊं न द्यावें. वसईकडे पाहावयास जाऊं लागतील तरी येकंदर त्याणीं न जावें. मातबर सरदार समागमे आहेत याजपासून जे मेहनत घेणे ते घेत जावी. आपण जवळ आहेत त्यांस वरचेवर सांगत जावें. लोभ असों दीजे हे विनंति+.

¶*Bajirao to his mother from Burhanpur, asking her not to let Chimaji Appa over-exert himself and not allow him to proceed to Bassein.*

*No. 38*] [*30-3-1740 ?*

छ १९ मोहरम

श्री

सेवेसी जगंनाथ नागेश विज्ञापना ऐसीजे. छ १२ मोहरमी आज्ञापत्र सादर जाहाले. तेथें आज्ञा की, तल्यात पाणी पहिले किती होतें व हाली नवे किती आले व पुढे नित्य नवें येतच आहे की काय हे तपसीलवार वर्तमान लिहून पाठवणे म्हणौन. त्याजवरून सेवेसी विनंती हेच की, पहिलें पूर्वाचे नक्षत्राचें पाणी, लांबी उतर दक्षण तिर्ही बुरुजामध्यें सुमार १०० हात व रुंदी पूर्व पश्चम असी नवद व खोली कोठे तीन हात कोठे च्यार हात येणेप्रमाणे होते पु(ढे) उत्तराचे दोन तीन पाऊस बरेच पडले. त्याचे पाणी पहिल्यासुधा लांबी उतर दक्षण हात सुमार ५०० व रुंदी पूर्वपश्चम हात २०० व खोली पहिली हात च्यार व हालीची हात १० येकून तेरा चौदा हात पश्चमेचे आंगे पके इमारतीकडे आहे. तिनी आंगे राहिली. तेथें कोठे च्यार हात कोठे पांच हात. कोठे अधीक उणे जसा जसा चड तसे आहे व आणखीहि वरचेवर येतच आहे. पावसाचे हि येतें. व जिले वोढे वाहा लागलें. पूर्वेकडील दोही खान्यातील वोढ व दक्षणेकडील तल्याचे पालीबाहीरील वोढे जिले वाहा लागले. ते खणोन बांधोन आणून तल्यात आणिले आहेत. पाण्यापासून वरची चौरसी व माथा बारा हात खुली राहिली आहे. व तल्याचा तळ रिकामा दक्षणेचे घाटाचे जाग्यापासून उतरेकडील घाटापावेतों पूर्वेचे आगाकडून लपेट लांबी हजार हात व रुंदी दक्षणेचे आंगे संभर सवासे दीडसे पावेतो व पूर्वेकडील आगी संभर

+ आवैनच्या सालांतील मोहरमांत बाजीरावाचा मुक्काम बऱ्हाणपुरास असलेला सापडतो. त्याचे पूर्वीच्या दोन सालांत मोहरम महिन्यांत त्याचा मुक्काम बऱ्हाणपुराकडे असलेला सापडत नाहीं. सबब सदर पत्र २३ मार्च १७४० चेंच असावें.

पावणसे व उतरेकडे कोठे पनास कोठे पावणसे कोठे शंभर हात येणेप्रमाणें पाण्यापासून इमारतीकडे रिकामा तल आहे. तिनी आगचे (ओढ्याचे) पाणी बाधोन वोढ्या(स) (पुढे फाटले) तल्यात आणिले आहे. तल्यातील मा(से) * * न जगले. व बागेतील झाडे कुल जगली. (आ)बराईहि पावसाचे पाण्याने कुल नवी फूट जाहाली. सदरहू लिा प्रमाणे लिंगोजी निंबाणेकर व कुसाजी गायकवाड याणी आपले नजरेने पाहिले; उपरात सेवेसी विनती लिा आहे. विनंती पत्रावरून व लिंगोजी मुखजबानी सागता विदित होईल. कुसाजी गायकवाड आजच येथून श्री जजुरीचे तले पाहावयासी गेले. येणेप्रमाणे सेवेसी श्रुत होय हें विज्ञापना. वरकड कामाकाजाचे वर्तमान मी उदईक सेवेसी येऊन निवेदन करीन. हे विज्ञापना[१].

¶*Jagannath Nagesh gives the extent of water in the Mastani tank at Vadaki just near the Diva pass on the Poona-Saswad Road.*

*No. 39*] [*8-6-1746*

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचें सेवेसी,

सेवक कृष्णराव माहादेव सां नमस्कार विनंती. येथील कुशल अशाढ सुध प्रतिपदा रविवार मुकाम श्री कासी जाणून स्वकीय कुशललेखनांज्ञा केली पाहिजे विशेष. बहुत दिवस आम्ही आलियातागाईत स्वामीकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाही. तरी आपल्याकडील सविस्तर वृत लिहिलें पाहिजें. इकडील वर्तमान तरी मातुश्री ताई व आम्ही श्रीमधें सुखरूप पावलो. चतुर्मास येथें कार्तिकश्नानाचा उदेग उरकून गयेस जाऊन. आपणास कलावे म्हणौन लिहिले असे. वरकड वर्तमान मातुश्री ताईने आपणास पत्र लिहिले आहे त्यावरून सविस्तर कलो येईल. प्रस्तुत+ मातुश्री शरीरी सावकाश आहे. चिंता न कीजे. घरी सर्वांचा सांभाल करीत असिले पाहिजे. आमची खर्चाची आबाल फार जाहाली आहे. सरकारातून काही अनकूलता होईल तर बरेच आहे. रोजमु(रा) स्वामीनी दरमाहे रुा सातसे देविले. त्यास सातशा रुपयाचा चारा दरमाहे पुरत नाही, तेथे आणखी तपसील काये ल्याहावा? नवाबाकडील वर्तमान लिहिले पाहिजे. आमचेविसी स्वामीनी नवाबास लिहिले त्याचे उतर काये आले ते लिहिले पाहिजे. बहुत काये

१ पुणे-सासवड-रस्त्यानें जातांना दिवे घाटाखालीं मौजे वडकीच्या शिवारांत, 'मस्तानीचें तळें' या नावाचें तळें लागतें; त्या तळ्यास अनुलक्षून या पत्रांतील मजकूर असावा असें वाटतें.

\+ येथून वळण निराळें.

लिहिणे, कृपालोभ असो दीजे, हे विनंती. राजश्री बाबास नमस्कार विनंती उपर, लिखितार्थ परिसोन उतर पाठविजे. घरी सर्वांचा परामर्ष करीत असाल. परंतु सूचनार्थ लिहिले असे. बहुत काये लिहिणे, लोभ असो दीजे, हे विनंती.

*¶Krishnarao Mahadev Joshi, brother of Kashibai, who had accompanied her on a pilgrimage, writes to the Peshwa from Benares about the future programme of their travels.*

*No. 40*]

**श्रीशंकर**

श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री नाना यांप्रती मातुश्री राधाबाई आसीर्वाद उपरी. येथील कुशल जाणून ताा छ १२ जिल्काद मुकाम ठाणे बारामती स्वकीयें कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही द्वादसीचे पत्र पाठविले ते ठाणे मजकुरी छ मजकुरी पावलें. कितेक विस्तारें लिहिलें ते येथार्थ आहे. राजश्री नाइकाचा हरयेक प्रकारे निकाल पडोन जेवतील; मग आम्ही तुम्हाकडे येऊ आगर पुणियास जाऊं. चिरंजीव सौ भिऊबाई येथेंच आहेत. चिरंजीव सौ गोपिकाबाईस तुमचे पत्रावरून प्रस्तुत पुणियास राहाविलीं आहेत. आजच पुणियास पत्रे राा केली आसत. याउपरी तुमचे पत्र जसे येईल त्याप्रमाणे करूं. बहुत काये लिहिणें हे आसीर्वाद.

*¶Radhabai to her grandson Nana. She appears to have gone to Baramati to conciliate Babuji Naik, who was fasting.*

*No. 41*]

**श्री**

यादी थैल्या येथून पाठविल्या पावल्या करणे

पौ छ १ सवाल

| | |
|---|---|
| १ मातुश्री बाई | १ राा आबाजी नाईक |
| १ सौ कासीबाई | १ माधवराव |
| १ सौ अनुबाई | १ नारो व्यंकटराव घोरपडे |
| १ उमाबाई | — |
| १ सौ भिऊबाई | ३ |

| | |
|---|---|
| १ सिऊबाई मामी | १ उपाध्ये |
| १ सदासिव | १ कृष्णार्जीपंत पुराणिक |
| १ रघुनाथ | १ सुभराव |
| १ जनार्दन | — |
| — | ६ |
| ९ | |

यो पंधरा थेल्या पाठविल्या अस(त) पृथक पृ(थ)क पावत्या करणे छ १० रमजान×

*Names of some of the Peshwa's relations.*

*No. 42*]

छ ४ रालोवल

**श्री**

आसीर्वाद उपरी मानाजी खलदकर याचा मजकूर पेशजी तुम्हास लिहिला आहे त्यावरून त्याचे घरी मसाला करविलाच असेल. साराश मानाजी बरा येवजदार आहे. सतर असी हजार रुपये पावेतो याचा वहिवाट आहे. आम्ही घोडी मागत होतो ते व तिची सिगी व आणखी गुंडाबावत घोडी मातबर व चवथी सारंगी ऐशा च्यार घोड्या चागल्या आहेत. त्या घेऊन पधरावीस हजार रुपये घ्यावयाची जागा आहे. पेशजी गुड फिराद जाहले होते, त्यांस पुन्हा उभे करून याजला जबेंत आणून खरा अगर खोटा करून, रुपये घोडी घ्यावी. राजश्री बापूजीपंत अगर देशमुख देशपांडे अथवा आणखी कोण्ही प्रतिपक्ष करितील त्यांचे न आइकणे. आश्री घोडी हाताखाले घालणें. +पैकाहि साधेल. हा वतनी कारभार आहे. लोभ असो दीजे हे विनंती.

*¶Bajirao's letter to Chimaji Appa, showing that his sense of justice was not very keen when self-interest came in. He orders that horses and money should be taken from Manaji Khaladkar, as he was a well-to-do person.*

×वरील यादींत पेशव्यांच्या कुटुंबीयांचीं कांहीं नांवें आलीं आहेत. शिऊबाई ही मल्हारपंत बर्वे याची बायको म्हणजे राधाबाईची भावजय असावी. अनुबाई व भिऊबाई ह्या बाळाजी विश्वनाथाच्या मुली.

+ येथून अक्षर खुद्द बाजीरावाचें.

No. 43]
पा छ ७ साबान.

**श्री**

**पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा**
**स्वामी वडिलांचे सेवेसी**

विनंती राजश्री माहादाजी पंतास राजश्री स्वामींनी हिंदुरायाकडे रवाना केले. येथें आम्ही येकलेच आहों. दरबारीं जावसाल करावयास कोण्ही नाहीं. तरी स्वामीनी पत्रदर्शनी राजश्री दादोबास[1] पाठविलें पाहिजे. त्यास दुसरेकडे जाऊं न द्यावें. टाकोटाक येथें येऊन पोंहचत तो गोष्टी करावी. आम्ही वाकीव नाहीं. तरी वडिली दया करून राजश्री दादास पाठविले पाहिजे हे विनती.

¶*Nana asks Chimaji Appa to send Dadoba Purandare to Satara for his help.*

No. 44] [1740 ?

**श्रीशंकर**

**श्रीमंत राजश्रियाविराजित राजमान्य**
**राजश्री पंत प्रधान स्वामी गोसावी**
**यांस**

सेवक गोपाल सोनदेव कमविसदार का साकोरे दि॥ राजश्री राऊ सुमंत सां॥ नमस्कार विनंती उपर येथील क्षेम जानोन स्वामींनी आपले वेभव लिहित आज्ञा केली पाहिजे. यानंतर कसबे मजकुरचे वर्तमान काल छ ७ रोज माहे रजब राजेश्री तुकोजी पवार वगैरे फौज कासारघाटीने आली त्यांस आपन जाऊन कासारीस पांच कोस जाऊन पाटील भेटविले. आपनहि भेटला. गांवचे वर्तमान सांगितले कीं मोकासा राजश्रीचा आहे. गाव बागाइती आहे. मुकामाची जागा व चाऱ्याचे जंगल दाखवितों. त्यास सर्व गोष्टीन मान्य करून येऊन थलांतच मुकाम केला. अगदी उसाची थले उलगाड (?) जाली. दोन फड सरकारचे होते, त्याजमधे हती उभे करून कही केली. थले मुतलक नाहींसी केलीं. सरदार उभे राहून कोनास ताकीद न केली. या सालास प्रजन्याचे आवर्षन जाले. लोकास कोलपत्रे देऊन वेळवाक करविले ते उंटे वाढून चारली.

१ पुरंदरे. + नानासाहेबाचें अक्षर.

गावहि खर्चीखाले. घासदाना वगैरे फर्मोविसी रूो सेंभर पडले. यामुळे गाव बहुत हुलहुला जाला. राजश्री सुमंत तो सनिध नाहींत कीं त्यास वर्तमान विदित करावे. आज छ ८ रोजी राजश्री बाजी भिवराऊ व आपाजी जाधव याची फौज आली. तिचाही मुकाम का मारी जाला त्यांही तो कांहीं तोसीस लावली नाही. त्यानी (ताकी)द केली कीं हे वर्तमान तुम्ही राजश्री राव यास लिहि (णे) त्यास स्वामी खावंद आहेत. आपन चाकर आहोत जे, वर्तमान साहेबास विदित करावे. न करावे तर धन्याचा शब्द लागेल की तुम्ही वर्तमान पावते न केले. गांव बहुत उदास जाला आहे. स्वामीस कळले पाहिजे. बहुत काय लिहिणे. कृ(पा) लोभ असो दीजे हे विनंती.

¶*A Kamawisdar reports to the Peshwa how the movements of armies destroy crops and ruin villages.*

N.B.—*This and the following letters which cannot be accurately dated but which have a general interest apart from the date, are given at the end of the section.*

*No. 45*]

पो छ २० साबान

**श्री**

**श्रीमंत मातुश्री बाईसाहेबांचे सेवेसी.**

आज्ञाधारक उधव वीरेश्वर चरणावरी मस्तक ठेऊन सां नमस्कार विज्ञापना. ता छ १४ माहे शाबानपर्यंत यथास्थित असे विशेष. मूळखडीचा पूल लाकडी बांधणे त्यास तालुके सिवनेर येथे कारखानदारास बोलाऊन आणून लांकडे मिळतात न मिळतात हें मनास आणून लिहिणे. त्याजवरून त्या वेळेस एक दोघे कारखानदार बोलाऊन आणिले त्यांचे वर्तमान सेवेसी लिाच आहे. परंतु त्याउपरी शोध करितां रामजी कडुसकर कारखानदार यास बोलाऊन आणिला. याने सरकारचे सनदेप्रो लाकडे आंबेघारगावावर आणून पोहचवावयाचे मान्य केले. त्याजवरून रामजी मजकूर सेवेसी पाठविला आहे. यास आज्ञा कर्तव्य ते करणार साहेब समर्थ आहेत. लाकडाचे खरेदीस ठिकाणास लाकूड पोहचावयासी तीस पस्तीस हजार पर्यंत रुो लागतील. सस्ते महाग कोणेकडून आणावयासी पडते त्याचा आजमासें जिकडून लाकडे न्यावयाची तिकडे आज्ञा करणार साहेब समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Udhav Vireshwar Chitale (Kiledar of Shivner) to Radhabai about building a bridge at Mulkhedi in the Poona District.*

No. 46] [9-3-1740 ?

**श्रीभार्गवराम**

**श्रीमत परमहंस स्वामी याही**

सहश्रायु चिरंजीव विजईभव चिमाजी आपा प्रधान यासी आज्ञा केली येसीजे. चिमणाजीचा सासरा धोंडोपंत सफरा भला ग्रहस्त होता तो मृत्य पावला. त्याचा पुत्र रामाजी धोंडदेव हबसी याजकडेस होता, त्याजकडून माणसे घेऊन आम्हा-कडेस आला. त्यास आम्ही तुमचे पदरी घातला. रामाजीचे लग्न जाले होते ते बाइको वारली. हाली त्याचे लग्न वैशाख मासी योजिले आहे. तरी रामाजी धोंडदेव यास पनरा दिवसाचा निरोप देऊन लग्न करावयास पाठवणे. लग्न च्यार दिवस जालियावर सवेच पाचवे दिवसी तुम्हाकडे रवाना करून. लग्नास खर्च पाच शत रुपये लागतात. येशास ब्राम्हण तुमचे पदरी घातला आहे. ब्राम्हणाचे लग्न केलियास बहुत पुन्य आहे. याचे लग्नाचे येश आपण घ्यावे. पाचशात आपणास काय अनकुल होईल ते द्रव्य सध्या देऊन रामाजीस पत्र दर्शनी पाठऊन देणे. अनमान न करावे. आपण लग्नास द्रव्य देऊन रवाना करितील. त्यातून काही विशेश सें पनास लागले तर आम्ही अनकूलता करून देऊन. रामाजी भला ब्राम्हण आहे. याचे आपण चालवीतच आहेत. यापेक्षा पुढे विशेष चालवावे. वराड होताच रवाना करितो. ठेऊन तरी तुझी आण असे. केसोबा मुखांतरे सांगता कळो येईल. बाजीराऊ याचा कागद सुखसमाचाराचा तुम्हास आला असेल त्याचे नकल करून आम्हाकडेस पाहावयास पाठवणे म्हणजे संतोष होईल. जाणिजे विशेष काय लिहिणे. रा छ २१ जिल्हेज हे आज्ञा.

¶*Brahmendra Swami to Chimaji, requesting help for the marriage of Ramaji Dhondadev Safre.*

No. 47] [19-12-1736 ?

**श्री**

सेवेसी विज्ञापना. ता छ २६ साबान पावेतों येथास्थित असे विशेष. थोर पाखरूं दिवाणखान्यांत आहे तें पाठवणें म्हणोन लिहिलें; त्यावरून पांखरूं कामाटी याजबा जासूद बरोबर देऊन पाठविलें आहे. पाखरास तांदुळ कैली ८८।. येक सेर दिल्हे आहेत. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Purandare to Peshwa from Satara, having dispatched the pet bird as ordered.*

No. 48]

**श्री**

**श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे शेवेसी**

विनंती शेवक कृष्णराव बापूजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. शेवकाचे वर्तमान ताा छ १८ रबिलोवलपर्यंत स्वामीचे कृपाकटाक्षेकरून यथास्थित आसे विशेष. स्वामीची आज्ञा घेऊन आलो ते दुसरे दिवसी पुणियास प्रविष्ट जाहालो. मातुश्री श्रीयात्रेहून शरीरी स्वस्थ नाहीं. परम कठीण आवस्थेने आली. तसेच टाकून स्वामीचे शेवेसी यावें तर लोकापवाद. यास्तव काही उतार पडलियां शेवेसी येतो. आज्ञेप्रा। बंगलियाचे काम पाहिले सविस्तर रामाजी विठल यानी शेवेसी विनंती पत्र लिहिले आहे त्याजवरून श्रुत होईल. बहुत लिहिणे शक्ति नव्हे हे विज्ञापना.

¶*Krishnarao Bapuji to Nana Peshwa—informing him of the illness of his mother.*

No. 49]

**श्री.**

**राजश्री बाजीराऊ पंडित प्रधान यांसी.**

प्रति सौभाग्यादिसंपन्न उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करीत जाणे विशेष. प्रस्तुत तुम्हाकडून पत्र येऊन राजश्री चिमाजी पंडित याचे वेथेचे वर्तमान कलत नाही, तरी येैसे न करणे. निरंतर पत्र पाठऊन संतोशवीत जाणे. यानंतर बटकी २५ पंचवीस देतो म्हणून मान्य केले, त्यास आजी किती दिवस जाहले, अद्यापि पाठविल्या नाहीत. यावरून काये म्हणावे ? याउपरी सदरहू पंचवीस बटकी उतम सेवेयोग्य पाठवणे. पुणेदेसी वगैरे देशात बटकीचा दुकोल आहे, मिलत नाहीत की काये, हे कलत नाही. याउपरी दिसगत न लाविता पाठऊन देणे. या कामास दावलखान व अनाजी ताव्या दिमत देवढी पाठविले आहेत. यास खर्चास रुपये १० दाहा देणे. जाणिजे. छ १२ माहे रबिलाखर. जरी बटकी पाठवीत नाहीत तरी तुमची भेट घेणार नाही ! जाणिजे. बहुत काये लिहिणे




¶*Some female member in the family of the Chattrapati writes to the Peshwa inquiring about the health of Chimaji Appa and reprimands him towards the end for not despatching 25 maid servants though he had promised to do so.*

No. 50]

श्री

आर्सार्वाद उपरी, तुम्हीं चिठी पाठविली ते पावली; आजी अयोग दोनतीन आहित याजकरितां फुरसिगीस राहातों. उद्यैक तेथे येऊन. बारसियाचा निश्चये कधी केला तो लिहिला पाहिजे म्हणोन लिहिले ते कळले. येशांस आजी शनवारी उतम नाहीच; उद्यलाहि बतीस घटका वैधृत आहे तरी तुम्हीं दिवस अस्तानंतर रात्रो चवथे पाचवे घटिकेस घरी येणें उतम आहे. बारशाचा निश्चये सोमवारी केला आहे. लोभ असा दीजे हा आर्सार्वाद.

¶[*Auspicious times for certain ceremonies are mentioned.*

No. 51]

श्री

चिरंजीव राधाबाई या प्रती मल्हार दादाजी कृतानेक आसीर्वाद येथील कुशल मार्गसीर सुध ९ जाणून आपल्याकडील कुशल ल्याहावया आज्ञा केली पाहिजे. यानंतर आम्ही तुमची आज्ञा घेऊन स्वार जालों ते पारनेरचे मुकामी लस्करास आलों. राजश्री आपाची भेट जाली. बारीपावेतों समागमेंच होते. मार्गी घरचे वर्तमानाचें पत्र चिरंजिवाचें आलें त्यावरून आज्ञा घेऊन काली कोटुरियास गंगातीरीं आलों. घर उघडें पडिलें. श्रीच्या चित्तास आलें त्यास उपाय नाहीं. रुणानमंध प्रमाण आहे. तिचें सार्थकच जालें. मागें मुलास सर्व प्रकारें तुम्ही वडील आहां. चिरंजीवाचे समाधान केलेच असाल. ल्याहाविसें नाहीं. खेद करूं न द्यावा व तुम्हीहि खेद न करावा. विवेकेकरून दुख निरशन करावें. मृत्यास उपाय नाहीं. तुम्ही सूज्ञ आहां. विशेष काये लिहू. चिरंजीव बावाचे लग्न होणे त्यास वेदशास्त्रसपन नारायण दिक्षित व त्र्यंबकभट खेडकर व समस्त ब्राम्हणाचे मतें तीन पक्ष जाल्यानंतर लग्न करावया कार्यास येईल येसा शास्त्रार्थ आहे. तिकडेहि विद्वान ब्राम्हण आहेत. मनास आणून लग्नसिधी करावयाचे केले पाहिजे हे आशीर्वाद.

¶*The death referred to in the letter may be that of Baburao Malhar's wife. Letter to Radhabai from her elder brother Malhar Dadaji Barve.*

*No. 52*]

## श्री.

### गंगाभागिरथी समान राधाबाई यांसी

प्रीतिपूर्वक कान्होजी आंगरे सरखेल दंडवत उपरी. येथील कुशल वैशाख बहुल पंचमीपर्यंत जाणून आपले क्षेम वर्तमान लिहित जाणे. सांप्रत तुमचें पत्र येत नाही ऐसे तर नसावे. आपलें सर्वदा कुशल वर्तमान लिहीत जाणे. बहुत काय लिहिणे हे विनंती+.

*No. 53*]

## श्री

आर्सीर्वाद. हर्ता कोणास न देणे. पैका कोणा सिलदारास न देणे. आगत्या आगत्य विचार पाहून संसार करणें. घोडी भुजाऊ पागेस ठेवणे. डोचट भोरप्या ह्याची पाहून खडून लोकास देणे. त्याचे कागद लेहून घेत जाणे. गजराज हती पवारापासून तजविजेने बसावयास अगर निशाणास म्हणून आगत्य मागून घेणे. आम्ही लिहिलेसे कलो न देणे. मोबदला पाहिजे तरी येखांदा त्यास मेळऊन देणे हा आसीर्वाद ×

*¶Bajirao in this autograph letter is giving some instructions to his brother Chimaji Appa. " Money and elephants should not be handed over to anyone. The elephant Gajraj should be taken from Pawar without letting him know that it is done at my instance."*

*No. 54*]

## श्रीगजानन.

### श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवसी.

सेवक कृष्णराव माहादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुषल जाणून स्वकीयें लिहिले पाहिजे विसेष. वडिलाचे आज्ञापत्र आले तेथे आज्ञा कीं सत्वर येणे. त्यास वडिलाचे कूच दिपवालीचे प्रतिपदेस आहे म्हणून ऐकतो. याजकरिता घरचे

---

+ सबंध पत्र एकहातचें, कान्होजी आंगऱ्याचें राधाबाई पेशवे यांस, बहुधा कान्होजीचें हस्ताक्षरच असावें. पत्रावरून पेशवे व आंगरे यांचा घरोबा व्यक्त होतो.

× सर्व पत्र खुद्द बाजीरावाच्या हातचें.

कितीक संसारिक कामकाज व स्वारीची तयारी करावी लागते. आपणावाचून कामकाज चालणार नाहीं. आवदा चिमणाजीपंत घरी नाहीं याजकरितां जे करणे ते आम्हासच करणे लागते. दो चौ दिवसात येथील. उलगडा करून आज्ञा येईल त्याप्रमाणे वर्तणूक करून. वरकड सविस्तर वर्तमान वेदमूर्त राजश्री सिवभट गाडगील सेवेसी निवेदन करितील तो सविस्तर अर्थ ध्यानांत आणून आज्ञा करावी त्या प्रमाणे आपण त्रयोदसीस स्वार होऊन येतो. विसेष आपण आजिपर्यंत थैसे समजत होतो कीं बाजीराव प्रधान याचे वचन म्हणजे ईश्वराचे प्रमाण वचन, कदापि अन्यथा होणे नाहीं. परंतु सांप्रत युगपरत्वे करून थैसे जाले कीं त्या वचनास अनृत लक्षण ग्रहण लागोन दोष लागला. वरकड आमचे गुणदोष म्हणावे तर आम्ही पतित आणि स्वामी पावन. पतितांचा उधार पावनानी करावा तें सामर्थ पावनाचे गेले म्हणजे उभयताहि पतित जाले. ईश्वरी वचन बुडाले येविसी बहुत ल्याहावे तर स्वामी सर्वज्ञ आहेत. बहुत काय लिहिणे ! कृपा लोभ आसो दिला पाहिजे. हे विज्ञापना.

¶*Krishna Rao Mahadeo remonstrates with the Peshwa for not having kept his word and promises to join him soon.*

No. 55]

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा स्वामीचे सेवेसी

विनंती. उपरी, राजश्री कुसाजी भोसले याचे लग्न राजश्री स्वामी करितांती. आजीपासून चौथे दिवसी लग्नाचा निश्चये केला आहे. त्यास आहेर वरकड सरकारातून करितील. स्वामीचे निसबतीने आहेर जाला पाहिजे. तरी संनगे पाठऊन दिल्ही पाहिजेत. त्याप्रमाणे आहेर करून विदित जाले पाहिजे. सेवेसी श्रुत होये विज्ञापना.

¶*Purandare to Chimaji Appa, requesting that a wedding-dress may be sent by way of a present to Kusaji Bhosle, the celebration of whose marriage was fixed by Shahu within four days.*

No. 56]

पा। छ १९ मोहरम.

श्री.

पुरवणी तीर्थरूप राजश्री राऊ व तथा राजश्री आपा स्वामीचे सेवेसी विनंती. का। सिवापूर येथील खासगत बागापैकी आंबे सुमार १०००० दाहा हजार

स्वामींचे जिल्हेत गावगना लावणीस दिल्हे हे वर्तमान पहिले तपसीलवार सेवेसी लिहिले होते. प्रस्तुत आंब्याचे कागद बागावरील कमावीसदारास घेऊन पाठविले असेत. तरी स्वामींनी आंबे आणऊन तमाम गावगना वाटणी करून लावणीस द्यावे आणि कुणबियास दहशत पडे आणि लावणी मुलकात आंब्याची होये ते अगत्यरूप करावे. येविसी राजश्री स्वामी वारंवार आज्ञा करितात, यास्तव आम्हीहि सेवेसी लिहितो. विदित जाहाले पाहिजे. का जिर्तीचेविसी पहिले लिहिले आहे तरी खामखा तेविसीचा बंदोबस्त होये ते अगत्यरूप केले पाहिजे. संताजी जासुदाबराबर पत्रे पाठविली आहेत त्याची उतरे लौकर पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Shahu orders Bajirao and Chimaji to carry out a plantation of mango trees in several villages.*

---

*No. 57*]

**श्री.**

**राजश्री पंतप्रधान गोसांवी यांसी.**

ॐ श्रीमंत सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्रो पिलाजी जाधवराऊ दंडवत विनंती. येथील कुशल जाणऊन स्वकीये कुशललेखन-आज्ञा केली पाहिजे विशेष. पत्र पाठविले तेथे आज्ञा केली कीं, रामायेण पुस्तकांतील युध्यकांड आहे त्याचे प्रयोजन आहे. तरी ते पुस्तक पाठऊन देणे म्हणऊन आज्ञा केली, त्यावरून येणेप्रा पुस्तक पाठविले आसे:

१ सुंदरकांड
१ युध्यकांड
१ उतरकांड
---
३

येकून तीन कांडे पाठविली आहेत. घेतली पाहिजे. विशेष काये लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंती







¶*Pilaji Jadhao sends to Bajirao a handwritten copy of three chapters of the Ramayana.*

No. 58]

**श्री.**

**राजश्री पंत प्रधान गोसावी यांसी.**

§ श्रीमंत सकलगुणाअलंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये श्री पिलाजी जाधवराऊ दंडवत विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये कुशललेखन करावया आज्ञा केली पाहिजे विशेष. पत्र पाठविले तेथे आज्ञा केली की, डुकराचें व वाघाचें व मोराचे व आसवलीचें व (व)डवाघलाचें येसीं तेले आणविलीं. प्रस्तुत आमचे संग्रही वाघाचें व डुकराचें व मुसरांचे येसीं तिन्ही जिनसाची तेलें पाठविलीं आहेत. आसवलीचें व वडवाघलाचें संताजी मानकर याजकडून देविलें आहे तेथून आणवावें. त्यांस पत्र लि॥ आहे. यानंतर आम्ही वऱ्हाडांतून येतसमई वाघ मारिले त्याचें तेल काढून बुधली भरून सख्यापासीं दिल्ही आहे. राजश्री विसाजीपंतास ठावकें आहे. तेहि जामदारखानियांत आणिले नसलें तरी आणविलें पाहिजे. विशेष काये लिहिणे हे विनंती.







¶ *Pilaji Jadhao sends some medicinal oils to the Peshwa.*

---

No. 59]

**श्री**

**पु॥ राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी.**

विनंती उपरी स्वामीस कोणी सांगितले असेल की कोकणचे मूग गोड उतम. येसे असेल तरी लक्ष प्रकारे खरिदी करून मूग कैली ·।।।· पधरामण पाठऊन देतो. कलावे याकरितां लिहिले असे. पधरामण स्वामीनी लिहिलेप्रमाणे पाठऊन देऊन. बहुत काय लिहिणे लोभ करीत गेले पाहिजे हे विनंती.

¶ *"Mug", a species of grain which is a speciality of the Konkan, is sent to the Peshwa.*

*No. 60*]

**श्री.**

**श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे सेवेसी.**

पोष्य वासुदेव जोसी कृतानेक नमस्कार विनंती येथील कुशल ता। जेष्ट वद्य पंचमी जाणून स्वकीये लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. आपल्या कारणे फणस ४ च्यार व अननासे ५ पांच पाठविली आहेत. घेऊन पावलियाचें उत्तर पाठवावे. येतेसमई भोयास चौरोजा अडिसेरी द्यावी. बहुत काय लिहिणें ? लोभ केला पाहिजे हे विनंती.

¶*Some fruit is sent to the Peshwa.*

*No. 61*]

पा। छ ८ सवाल

**श्री.**

**पु। राजश्री आपा स्वामीचे सेवेसी.**

विनंती उपरी. स्वामीनी अस्पी नगारियाविसी आज्ञा केली होती त्यावरून नगारे नवे सजून जोडी येक पाठविली आहे. तांबे वजन पके ८।२। सवाबारासेर लागले आहे. बहुत काय लिहिणे. यास मसाला नगारची सागेल त्याप्रमाणे देविला पाहिजे. हे आपले विचारास आले तरी या प्रा। आणखी येक दोन जोडिया लागल्या तरी तयार करून पाठऊन देऊन. बहुत काय लिहिणे ? लोभ केला पाहिजे हे विनंती.

¶*A pair of drums is prepared and sent to Chimaji Appa.*

*No. 62*]

पौ छ १ सवाल.

**श्री.**

**पुरवणी राजश्री आपा स्वामीचे सेवेसी.**

विनंती उपरी. प्रस्तुत वर्तमान येकितो कीं स्वामीनी आपल्या वाड्याभोवता कोट घालावयास प्रारंभ केला आहे. त्यास आमचे घर व राजश्री गोविंद हरी याची घरे कोटा बाहेर पडतात. त्यास आमचे विचारे ही घरे बाहेर टाकावी येसे

नाहीं. कोटांत घ्यावीं ये गोष्टीस पैका जाजती पडला तरी ज्याची घरें ते देतील आणि आपण घ्यावा परंतु घरे कोटाबाहेर न टाकावीं. नाहीतरी आम्हांस घर मोडावे लागेल. कळावे याकारितां लिहिलें असे. बहुत काय लिहिणं, लोभ केला पाहिजे हे विनंती.

No. 63]

श्री.

पुा राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसी.

विनंती उपरी. वसईस सुकेळी होतात त्या केळीचे नांव राजेली. त्यास राजेली केळीची रोपे वसईस माणसे पाठऊन आणून स्वामीकडे बाा सिपाई धर्मोजी मगर पाठविली सुमार ३५ पचतीस पाठविली आहेत हीं स्वामीनीं आपले बागेमध लाविली पाहिजेत. आणि पावलियाचे उतर पाठविले पाहिजे हे विनंती.

¶*Some Rajeli banana plants, a species known for its keeping qualities, are sent to the Peshwa to be used in his gardens.*

No. 64]

पाा छ ८ जिलकाद.

श्री.

पुा राजश्री पतप्रधान स्वामींचे सेवेसी.

विनंती उपरी. तांबटास भाडी घडावयाची धोंडी कल्याणास आहेत म्हणून विदित जाहाले. येशास धोंडीचे प्रयोजन आहे तरी धोंडी उतम २ दोन अगत्य पाठवणे म्हणून लिहिले. येसियासी येथे धोंडी नाहीत. येथें तांबट आहेत. त्यांजपुरत्या दोन तीन नेमस्तच आहेत. जाजती आहेत येसे नाहीं. येथे मिळत नाही हे विनंती.

No. 65]

श्री

राजश्री माहादोबा गोसावी

यासी

विनंती उपरी. चिरंजीव राजश्री आपा गंगापार होऊन गेले. त्याजकडून कासीद पत्रे घेऊन आले श्रावण शुध सप्तमीची पत्रे आहेत. चिरजिवाजवळी वर्तमान आले

की श्रीमत् राजश्री पतप्रधान यासी पुत्र जाला. त्याणी पत्री लिहिले नाही परंतु जबानी कासिदाने सागितले. हे संतोशाचे वर्तमान तुम्हास कलावे याकरिता लिहिले असे. हे विनती. गंगेपलीकडे आलीकडे पाऊसहि बरा आहे हे विनती.

¶*The birth of a son to the Peshwa is reported to Mahadoba Purandare.*

---

*No. 66*]

श्री

**श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामाचे सेवेसी.**

पोष्य वासुदेव जोसी कृतानेक नमस्कार विनंती येथील कुशल ताा छ १९ माहे सफर जाणून स्वकीये लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. स्वामीनी जासुदा समागमें पत्र पाठविलें कीं मधाचे व सोरलतेलाचे प्रयोजन आहे याकरितां पूर्वी लिहिले होते परंतु पाठविलें नाहीं. तरी हली सोरल पेणेतून आणून व मध येसे पाठवणे म्हणून लिहिले. येसियासी येविसी पूर्वी कांही पत्र आले नाहीं. हली लिहिले येसियासी सोरल पेणेतून आणून पाठवावे त्यास प्रस्तुत तेथेहा हगाम नाही. तेथे-हि मिळणार नाहीं याकरिता सोरल थोडकेसे घरात होते ते व मध मेळऊन पाठविले असे.

| | |
|---|---|
| मध घागर १ येकूण वजन पक्के ८। | सोरल घरांतील होते ते पाठविले वजन पक्के ८८९॥. |

येकूण मध वजन पक्के दाहासेर पक्के व सोरल वजन पक्के साडेपांचसेर पाठविले आहेत. कळावे याकरिता लिहिले असे. येकूण मध व सोरल वजन पक्के साडेपंधरा-सेर पाठविली आहे. बहुत काय लिहिणे? लोभ करीत गेले पाहिजे हे विनंती.

¶*Vasudeo Joshi sends to the Peshwa some honey and other articles.*

*No. 67*]

श्री

विनंती सेवक तुबाजी अनंत साा नमस्कार. सेवेसी प्रार्थना येसजे, आजी सनिवारी सेवसी पत्र माहाराज मातुश्री आईसाहेबाचे आज्ञाप्रमाणे आम्ही सेवेसी लिहिले की सोमवारी सूर्योदयापूर्वी येथून कूच होईल म्हणौन लिहिले होते. त्यासी आजी दोनप्रहरा बोलाऊन नेऊन आज्ञा केली की तुम्हाकरवी कागद लिहिविला. उदईक येतो. येथे आता गावचा जोसी आला होता. त्याने मुहूर्त सांगितला कीं

मंगळवारी प्रयाणास व प्रवेशास मुहूर्त आहे. व अकरावा चंद्र आहे म्हणौन सांगितले. त्यासी सुमुहूर्ते भेटी होवी; ग्रामप्रवेश सुमूर्त करावा, येक दिवस आधिक लागतो. पेशव्यास आताच पत्र लिहिणे. मंगळवारी आम्ही येतो. त्यावरून विनंती लिहिली आहे; व स्वामीची आज्ञा होती की बराबरच्या लोकाचे गणति नावनिसीवार पुराणिकापासून लेहून मागितली. त्यानी लेहून दिली त्याची नकल सेवेसी पाठविली आहे. याची तरतूद असो द्यावी; व काली रात्री पागेची घोडी बोर येत होती. पागेची घोडीचा पाय नलीत जाऊन टिकार पडले. घोडी येलूनजीक राहिली. प्रात:काली माणोस पाठविले तो घोडी मेली. स्वामी म्हणतील की सकाळ येक लिहिले आता यैसे लिहिले? यासी आमचा इलाज काये आहे. आज्ञेप्रमाणे सेवेसी लिहितो. बहुत काये लिहिणे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापि.

¶*Tubaji Anant, Peshwas' agent in the Konkan, writes to the Peshwa from Satara about the auspicious hour for entering a new house and other matters. He also refers to an accident to a mare.*

*No. 68*]

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी विनंती. वेदभाष्याचे पुस्तकाविसी तुम्हास लिहिले होते त्याचे उतर तुमचे आले कीं, वेदमूर्ति रा विस्वनाथ जोसी रायेरीकर यापासून पुस्तक आपण घेतले नाही व दुसरे आपले संग्रहीहि नाही. त्यावरून हाली जोशाचे पत्र बजिनस अलाहिदा तुम्हास पाठविले आहे. मनास आणून खामखा वेदभाष्याचे पुस्तक बहुत माफजातीने पाठऊन देणें म्हणून स्वामीनी पत्री आज्ञा लिहिली. यैसियास, पूर्वी सेवेसी विनंती लिहिली ते स्वामीस मिथ्या भासोन, जोशाचे पत्र घेऊन पाठविले. तस्मात, आमच्या लिहिलियाचा विश्वास नाही यैसे दिसोन आले. तरी स्वामीच्या पायासी आपण मिथ्या भाषण करू हे गोष्ट सर्वथा होणार नाही. विस्वनाथ जोसी समर्थ. त्यास काये म्हणावें? नसता विकल्प स्वामीचे चितात येईल जाणोन चिरंजीव बाबूराव सिनरी आहेत, त्यास हे वर्तमान लिहिले. त्याचे उतर आले की, पूर्वी पुण्यात आम्ही असता वेदभाष्याची चर्चा जोशाजवळ निघाली होती. ते समई जोसी आपल्याजवळ बोलिले होते कीं, आपले संग्रही पुस्तक होते ते द्रव्यपर्यायें वेदमूर्ति त्रिंबकभट खेडकर वास्तव्य नासिक याणी नेले. त्यावरून त्रिंबकभटास पत्र लेहून सरकारचा कासी तिकोना जासूद व आम्ही आपली माणसे नासिकास

पाठविली; पुस्तक आणविलें. त्याणी उतर लिहिले की, आजी वीस वर्षें रायेरीकरापासून पुस्तक विकत आपण घेतले. त्या पुस्तकावर सता दुसरियाची नाही. द्रव्य देऊन पुस्तक घेतले असता तुमचे नाव कशास घ्यावे. पुस्तक आपण देत नाही, यैसे परिछिन उतर त्रिंबकभटी दिल्हे. आग्रह करावा तर भिक्षुक ब्राह्मण. उपाय नाही. स्वामी समर्थ आहेत. आपली आज्ञा त्यास जालियावर देतील तर न कले. रायेरीकरास आम्ही पत्र पाठविले आहे. प्रविष्ट जालियावर त्यासहि उमज पडेल. विस्मृतीने आमचे नाव त्याणी घेतले आसेल. आपण त्यापासून पुस्तक घेतले नाही. विश्वास मानावा. * हे विनंती.

¶*On being asked by the Peshwa why the copy of Vedabhashya was not returned, the writer explains that he is not responsible for it as it passed to several persons from hand to hand.*

---

*No. 69*]

श्री

पुरवणी राजश्री राऊ प्रधान स्वामीचे सेवेसी विनंती विज्ञापना जे. राजश्री जानबा साहेबानी श्रीमंत मातुश्री बाई वडिलास वस्त्रें पाठविलीं ततुसमई सौभाग्यादिसंपन्न मातुश्री कासीबाईसाहेबांस वस्त्रें पाठविली. माहाराजाचें आगमन होईल याजकारितां मार्ग लक्षिला. सांप्रत रा आपासाहेबांचा निरोप घेऊन राजश्री जानबासाहेबांकडे गेलो. सौ मातुश्री बाईसाहेबाची वस्त्रे सुतडे काले पोफले व चोली तापथियाची यैसी सनगें दोन सेवेसी पाठविली आहेत. ज्याची त्यासीं प्रविष्ट करून कृपा करून प्रत्योतर देविले पाहिजे. बहुत काये लिहिणे, कृपा असों दीजे, हे विनंती.

¶*Bajirao is requested to hand over to his wife the robes of honour sent by Janba Nimbalkar.*

---

*No. 70*]

**श्रीव्यंकटेश**

**श्री सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलकृत**
**राजमान्य राजेश्री चिमणाजी**
**पंत आपा स्वामी गोसावी यासी**

पो व्यंकटराऊ नारायेण कृतानेक सााा नमस्कार विनंती उपर येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष. आपण जासुदाबराबर पत्र पाठविले तेथे लिहिले

की कारजकराबाबत कापड कोठे आहे हे कलत नाही. सावकाराचेथे शोध केला परंतु कोणी सागत नाही तरी कोठे आहे हे लिहिणे म्हणजे पाठऊन देऊ म्हणून आज्ञा केली. त्यावरून कारजकरास बोलाऊन विचारले. त्याणे नारोबा नाईक अनगल यास पत्र दिल्हे आहे ते बजिनस पाठविले आहे. त्यास देऊन कापड घेऊन उटावर लौकर येथे येऊन पोहचेसे केले पाहिजे. सौ. मातुश्री लक्षुमीबाई राजेश्री गोविंद हरि याची मातुश्री तेथे आहेत त्यास येथून पालखी पाठवावी तर येथे सध्या अनकूलता नाही यास्तव आपणास लिहिले असे. तरी हर कोणा-कडील पालखी मेलऊन मातुश्रीची रवानगी सत्वर केली पाहिजे. लग्नाचा निश्चय पूर्णिमेसच केला यास्तव त्वरा केली पाहिजे. तेथील ग्रहस्तास आमंत्रणपत्रे पाठविली आहेत तरी आपण कारकुनाचे हाती देऊन ग्रहस्तास आमंत्रण केले पाहिजे. बहुत काये लिहिणे? लोभ असो दिजे हे विनंती.

¶*Vyankatrao Narayan to Chimaji Appa: makes enquiries about the cloth of Karajker and asks him to secure a palanquin for Govind Hari's mother.*

*No. 71*]

## श्रीव्यंकटेश

### तीर्थरूप राजश्री अपा वडिलांचे शेवेसी,

अपत्ये सौभाग्यादिसंपन्न अनुबाई कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम आश्विन वद्य त्रयोदसी भृगुवासरपर्यंत मुकाम नांदणी वडिलांचे असीर्वादेकरून सुखरूप असों विशेष. बहुत दिवस जाहाले, अम्ही आल्यादारभ्य परामर्ष होत नाही. ऐसे न पाहिजे. निरंतर पत्री सांभाल केला पाहिजे. यानंतर त्या प्रांतात महर्गता व बरग पडिले अहे. यैशास, आम्हाकडे हरभरेहि सवंग आहेत, गवतहि अहे. सुभिक्ष धान्य अहे. याकरिता वडिली पागेच्या मादवाना वीस-पंचवीसपात्रतो पाठविलिया उतम आहे. निगादास्तहि आम्हास कलेल तैसी करूं. याकरिता वडिली या पत्राचे मनन करून अगत्यरूप पाठविली पाहिजे. बहुत काये लिहिणे, कृपा असो दीजे, हे विनंती.

¶*Anubai to Chimaji Appa, requesting a few mares being sent to be trained under her care.*

No. 72] [1734

छ २२ सवाल

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती. सेवक बाबूराऊ मल्हार सां। नमस्कार विनंती. ता। छ ११ सौवाल-पर्यंत स्वामीचे कृपेकरून वर्तमान येथास्थित असे. यानंतर स्वामीचे आज्ञापत्र काली संध्याकाली सादर जाले की, "आपण हुताशनीकरिता माहाराज स्वामीची आज्ञा घेऊन पुण्यास आलो. वर्षाचा दिवस. इष्टमित्र येके स्थली हुताशनी करावी ऐसा विचार आहे. यास्तव, तुम्ही पत्र पावताच स्वार होऊन येणे. पंचमी जालियावरी सर्वच आज्ञा घेऊन जाणे" म्हणून पत्रीं आज्ञा केली, तेणेकरून बहुत संतोष जाला. आम्हा स्वकीये लोकांचे स्वामी छत्र आहेत. दुसरें गौरव कोण करणार आहे ? लक्षप्रकारें आज्ञेप्रा। स्वार होऊन सेवेसी यावे. त्यास इकडील सर्व विचार पूर्वी सेवेसी लिहिला आहे त्यावरून श्रुत जाला असेल. नवाब अबदुल अजीजखान नासिकी येऊन दाभाडियाकडील लोकी किले त्रिंगलवाडी घेतली होती ते फिरोन घेऊन आले. दाभाडियाकडील कमावीसदार व माणसे येकेकडे जाली आहेती. पुरसीस मांडिली आहे. आम्हास परवा येक पत्र व काली येक पत्र आले कीं, भेटीस येणे. कामकाज तो अगदी सर्वांचे बंद आहे. आपणास येऊन पंधरा दिवस जाले; इतकियांतच येकाकी येथून स्वार होऊन यावे तेव्हा त्यांचे चितात काये येईल न कले. आपले गुमास्ते माहाली माहाली आहेती. जमाबंदीचे दिवस. कामाकाजास अंतराये होईल. अद्याप बाबती व सरदेसमुखीचा पैका वसूल नाही. मुलकात होईल की, त्वरेने कां गेले ? विपर्यास मानितील. तांब्राच्याहि चिती काये येईल ? ऐसा अर्थ. दुसरे, उष्ण काल दिवस. माझे शरीर स्वाधीन नाही. पत्र पावले (तों) दिवस थोडे. त्वरेने यावयाची शक्ति नाही. फिरोन त्वरेने यावे लागेल. मागे कामकाज होणे. ऐसा विचार देखिला. वाईस गेलो; लग्नसिधि जालियाउपरी स्वामीसंनिध येऊन भेटी घ्यावी आणि आज्ञेप्रमाणे इकडे यावे. त्यास, हुताशनी पंधरा दिवस राहिली. स्वामी आज्ञा देतील न देती. इकडे तो कामकाजाचा अगत्यवाद. यास्तव, भेटीस न येता स्वार होऊन आलो. इतका अर्थ पाहोन हुताशनीस यावया अंतराये केला. आपणास सर्वप्रकारें वडील स्वामी आहेती. आज्ञेचा उलंघ जाला याची क्षमा केली पाहिजे. मी खासगत चाकर. उजूर नाही. परंतु तीर्थरूप येंदा येथे ना(ही)त ; यामुले चार दिवस विरजीक करावी म्हणून आज्ञा न घेतां आलों.

आज्ञापत्राप्र॥ स्वार होऊन यावे; परंतु विस्तरें वर्तमान लिहिले आहे यामुले अनमान जाला. दुसरे, दरम्याने तीन दिवस राहिले यैसा अर्थ समजोन आलों नाही. अपराध क्षमा केला पाहिजे. विदित हाये हे विनंती.

हे विनंती.

¶*Baburao Malhar (Barve) to the Peshwa, regretting his inability to be present at Poona for the Hutashani especially in view of the impending trouble by the Mughals in his province.*

*No. 73*]

**श्री**

चिरंजीव राजश्री बाजीराऊ यांप्रति राधाबाईने कृतानेक आर्सीर्वाद उपरी. सौभाग्यवती चिरंजीव भिऊबाईस पातल पाठविले ते व चोली आपणाजवळील यैसे देणे म्हणून लिहिले. ऐश्यास, ते परभारीच आपले घरी गेली. आर्जी सात-पांच रोज रुसली आहे. थोडा घेतलेबगर समजत नाही. कलले पाहिजे. चोली व पातल त्यांचे घरी पावावयासी पाठविते. हे विज्ञापना.

¶*Radhabai writes to her son Bajirao about some petty grievance of her daughter Bhiubai.*

*No. 74*]

छ २२ जिल्हेज.

**श्री**

पुा राजश्री आपा स्वामीचे सेवेसी विनंती उपरी. स्वामीकारणे सुरण गोंडा येक थोर व येक लाहान यैसे दोन पाठविले आहेत. त्यास, या सुरणास मध्यें मोड फुटलें आहेत त्याचे चौफेर कापून भक्षावा. मोडाभोवतां अनमाने अदसेरेक वजन सुरण ठेऊन तो लावावा म्हणजे फिरोन जेव्हड्याचा तेव्हडा भुईमधे होतो. तरी लिहिलेप्रमाणें करावें. कलले पाहिजे हे विनंती.

¶*This letter, written to Chimaji, refers to a peculiar variety of an esculent root* (सुरण), *presented by the writer*

No. 75]

श्री

चिरंजीव सौभाग्यवती कासीबाई यांसी प्रति मातुश्री राधाबाई आसीर्वाद उपरी. येथील कुशल ताा जेष्ट वद्य चतुर्दसी जाणून आपणाकडील सविस्तर वर्तमान लेहून संतोषवीत जाणें विशेष. बहुत दिवस तुम्हाकडील वर्तमान कलें येत नाही, तर सविस्तर लेहून पाठवणें. आपणांस व चिरंजीव बालास जतन करणें. जनार्दनास जतन करणें. बहुत काय लिहिणें, हा आसीर्वाद.

हेच सौ अनुबाई व सौ भिऊबाई यांचे नमस्कार. लोभ असो दीजे हे विनंती.

आश्रि[त] कृष्णभट कर्वे आसीर्वाद.

¶*Radhabai to her daughter-in-law, Kashibai, asking her to take proper care of Bal and Janardan.*

No. 76]

श्री

चिरंजीव विजयीभव राजश्री नानास प्रति सौ कासीबाई असीर्वाद उपरी. येथील क्षेम ताा श्रावण बहुल अमवाशापर्यंत सुखरूप आसो विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावोन वर्तमान कलो आले. येसेंच सदैव पत्र पाठऊन समाचार घेत जाणे. तुम्हाकारणे अंजीर सुमार ९ नव पाठविले आहेत हे घेणे. तुम्हास अंजिराची आवडी असली तरी लेहून पाठवणे. येथून थोडेबहुत पाठवीत जाऊन. तुमचे पत्र आले ते आम्हास न कलत राजश्री आपास कलले. त्याणी वाचून पाहिले. त्यावरून बहुतसे कौतुक करून बाजी भिवराऊ यास पत्र लिहिले आहे त्यावरून वर्तमान कलेल. तुम्हास तेथे पेरू मिलत असिले(स) थोडे-बहुत बालास पाठवीत जाणे. बहुत काय लिहिणे, हे आसीर्वाद.

पो नारो गंगाधर सां नमस्कार विनंती उपरी आबाकारणे स्वामीच्या स्वहस्ताक्षरे दाहा बंद लेहून पाठवीजे. आनमान सहसा न कीजे. बहुत काये लिहिणे कृपा निरंतर कीजे हे विज्ञापि.

सेवेसी विज्ञापना. बालाजी करकरे यांचे सां नमस्कार, हे विज्ञापि.

¶*Kashibai writes in endearing terms to her son Nana asking him how he enjoyed the figs sent by her.*

No. 77]

छ ८ मोहरम.

श्री

श्रीमंत माहाराज राजश्री पंतप्रधान स्वामीचे शेवेसी चरणरज आपाजी सेटगे सां दंडवत विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ ४ मोहरमपर्यंत स्वामीचे कृपावलोकनकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनी आज्ञापत्र पाठविले ते अक्षरशा वाचून आज्ञेप्रमाणे अवरंगाबादेहून दाई आली आहे तीस बोलाऊन आणून पत्रार्थ सांगितला. तिणे उतर दिल्हें कीं, आपण अवरंगाबादेहून आपली दाहावीस माणसे टाकून येथें खिजमतीस आल्ये आहे. केवळ पोटानिमित्य आल्ये येसे नाही. वख्तवीराची चाकरी करून मजुरा करून त्याला याच उदेश आल्ये आहे. त्यास, येकच वेळ आवघियास औषध दिल्याने गांठी कैसी पडल्ये ? गुण कैसा येतो ? तरी आधी येकास औषध देवणें. त्यास गुण येऊन शरीर दृढ जाहाले म्हणजे मग दुसरियासी देवणें. ज्यास औषध देइन त्याजवळ नेहमी असावे लागते म्हणोन बोलली. त्यास, घरांत सौभाग्यवती मातुश्री कासीबाईच्या शरीरास आरोग्य नव्हते. तोंडास पाणी सुटत होतें व अन रुचत नव्हते. त्यांस स्वल्पसा उपाय करून औषध देविले. त्याणेंकरून गुण आला. तोंडाचे पाणी राहिले, अन रुचों लागले. त्यावरी आणखी चाळीसपंनास प्रकारची औषधें सांगितली. त्यास, वाणियाचे घरची होती ते वाणियांपासून घेतली. रानातून आणायाची होती ते रानातून आणिली आणि औषधास प्रारंभ केला आहे. यांस उत्तम प्रकारचा गुण जाहाला. शरीर दृढ जाहाले म्हणजे सेवेसी लिहून पाठऊन. उपरांत नणदीकराकडे नेहमी महिनाभर दाईस ठेऊन आज्ञेप्रमाणे त्यांकडे उपायें करून. मतवाली व सांहवीस औषध द्यावे व तालीम करवावी व

*No. 78*]

श्री

गंगाजान्हवी मातुश्री बाई वडिलांचे सेवेशी,

प्रति सौभाग्यादिसंपन्य राधाबाई दाभाडे दंडवत विनंती उपर. येथील कुशल जाणून स्वकीय कुशललेखण करीत गेलें पाहिजे विशेष. आपण माहायात्रा करून आला हे वर्तमान येकोन परम समाधान जाहालें. परंतु आपण स्मरणपूर्वक पत्र पाठऊन माहायात्रेचा प्रसाद पाठविला नाहीं. येसी निष्ठुरता धरिली न पाहिजे. सदैव पत्रद्वारें सांभाल करीत गेलें पाहिजे. तणेंकरून चिताचें सामाधान होत जाईल. राजश्री चिमणाजीपंतआपा यांसी शरीरी वेथा प्राप्त जाहाली आहे, तणेंकरून चित स्वस्त नाहीं. रा। तुकपा। दाभाडे पाठविलें आहेत. तरी आरोग्यते [चि] लेहून पाठविलें पाहिजे. तणेंकरून सामाधान होईल. बहुत काये लिहिणें, लोभ असों दीजे हे विनंती.

¶[*Radhabai Dabhade, probably wife of Krishnaji, congratulates Radhabai Peshwa on her safe return from the pilgrimage. She further makes enquiries about Chimaji Appa's health.*

*No. 79*]

पौ॥ छ १९ सवाल.

श्री

# श्री

श्रियासह चिरंजीव राजश्री चिमाजी यासी बाजीराऊ बल्लाळ आसीर्वाद उपरी. येथील कुशल कार्तिक वद्य प्रतिपदा जाणून तुम्ही आपणांकडील कुशल लिहीत जाणें विशेष. राजश्री बाळाजीपंत येथे आम्हाजवळ होते. यांची माणसे नासिकास आहेत. त्यास, धामधुमेचा प्रसंग दिसत असता माणसे तेथे ठेवावी हे अनुचित. यास्तव, माणसे देसी आणावयासी आज्ञा करून यास तुम्हाकडे पाठविले आहेत. हे नासिकातून माणसें पुण्यास आणवितील. त्यास राहावयास घर जागा साहित्य उतम करून देवणें व येक गांव यास वरवांटे जवळपास कुटुंबा अनकूलता होय येसा पाहून देणें. यास गुदस्ता मोईनपैकी रुपये १००० येक हजार व बाबती खानदेशपैकी रुपये ५०० पांचसे, येकून दीड हजारांची नेमणूक केली. तो येवज यास पावला नाही. येसियास येवज जिकडे थारला असेल तिकडे ताकीद करून देवणें. साल मजकुरी गुदस्तांप्रमाणे नेमणूक करून देणें. यास बसावयास घोडे नाही. त्यास, यांजयोग्य तुरकी घोडी पागेपैकी देणें. लोभ असो दीजे हा आसीर्वाद.

*¶Bajirao asks Chimaji Appa to make arrangements at Poona for the visit of Balajipant from Nasik who is required to shift his family on account of some trouble there. It should also be arranged—he writes—that he gets the Rs. 1,500 promised to him last year as remuneration.*